# अनुक्रमणिका

!! अल्लाहच्या नावाने, जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे !!

# प्रस्तावना

मानवी जीवन ईश्वराच्या बुद्धिमत्तेचे अप्रतिम असे प्रदर्शन आहे; ईश्वराच्या सत्तेचे व कलेचे सुंदरसे प्रतिबिंब म्हणजे मनुष्य जीवन आहे. तोच हे जीवन देणारा आणि निर्माता आहे. या सृष्टीत आपोआप असे काहीही घडलेले नाही. कोणीही स्वत:ला निर्माण केले नाही किंवा दुसऱ्याने निर्मिले नाही. ईश्वरानेच मनुष्याला जीवन दिले आणि तोच याचे सामर्थ्य राखून आहे की जीवनाला परत घ्यावे. कुणालाही स्वत:चे जीवन संपविण्याचा काडीमात्र अधिकार नाही. म्हणून इस्लाममध्ये प्रत्येक प्रकारची आत्महत्या करण्यास निषिद्ध आहे. या जगातील जीवन हे शाश्वत नसून क्षणभंगूर जीवन आहे आणि शाश्वत जीवन प्रवासातील एक थांबा आहे. या प्रवासात मनुष्य एक प्रवासी आहे, भविष्यातील जीवनात काय उपयुक्त आहे; याचाच त्याने ध्यास घेतला पाहिजे. म्हणजेच जितके शक्य होईल तितका सदाचार केला पाहिजे आणि अशा प्रकारे शाश्वत जीवनाचा स्वीकार करण्यासाठी सतत तयार राहिले पाहिजे. या जगातील जीवन जास्तीतजास्त चांगले करण्यासाठीची चालून आलेली संधी आहे कारण अंतिम समय येता, त्यास एक सेकंदासाठीसुद्धा मनुष्य पुढे ढकलू शकत नाही. या जगातील कालमर्यादा संपुष्टात आल्यानंतर मनुष्यापासून कर्म करण्याची संधी हिरावून घेतली जाते.

या जगातील जीवन योग्य पद्धतीने जगणे म्हणजे निर्मिकाच्या शिकवणीनुसार जीवन जगणे आहे आणि याद्वारे भविष्यातील शाश्वत जीवनाचा प्रवास सुकर करणे आहे. या जगातील जीवन ही एक सुवर्णसंधी आहे अंतिम ध्येय प्राप्त करण्याची, म्हणून इस्लाम एक परिपूर्ण व आदर्श जीवनप्रणाली आहे. त्यानुसार या जगात जीवनयापन करून या जगात व भविष्यातील शाश्वत जीवनात यशप्राप्ती व ईशप्रसन्नता प्राप्त होते. मानवास ईश्वरानेच निर्माण केले आहे आणि सर्वजण शेवटी त्याच्याचकडे परतणार आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मनुष्यजातीला उपदेश केला, ''मनुष्य या जगात एक प्रवासी आहे आणि परदेशी आहे.''

इस्लामच्या तीन मौलिक धारणा आहेत. त्यापैकी पारलौकिक जीवनावर श्रद्धा ठेवणे एक आहे. कुरआनच्या पहिलाच अध्याय 'अल फातिहा'मध्ये प्रथमत: ईशस्तवन केल्यानंतर त्वरित ईश्वराला अंतिम दिनाचा म्हणजे न्यायनिवाड्याच्या दिवसाचा स्वामी

म्हटले आहे. पाहा, कुरआन, १:३.

त्याचप्रमाणे दुसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकामध्ये श्रद्धावंताची व्याख्या देण्यात आली आहे. जो कोणी परोक्षावर श्रद्धा ठेवतो, असा मनुष्य श्रद्धावंत आहे. पाहा, कुरआन, २:३.

कुरआननुसार परोक्ष या संकल्पनेत मृत्युपश्चात न्यायनिवाड्याच्या दिवशी समस्त मानवजातीला पुन्हा जिवंत उठविले जाईल. तसेच पारलौकिक जीवनासंबंधी सर्व बाबींचा समावेश करण्यात आला आहे. जन्नत (स्वर्ग) व जहन्नम (नरक) यांचा समावेश 'परोक्ष' अंतर्गत आहे. कुरआनच्या दुसऱ्या अध्यायात लगेचच चौथ्या श्लोकात म्हटले आहे, "त्यांचा (श्रद्धावंतांचा) पारलौकिक जीवनावर दृढ विश्वास (दृढ श्रद्धा) असतो." अशा प्रकारे सुरुवातीलाच पारलौकिक जीवनावरील श्रद्धेच्या महत्त्वाला लागोपाठ दोनदा स्मरण करून देण्यात आले आहे.

पारलौकिक जीवनावर दृढ श्रद्धा बाळगणारा स्वाभाविकपणे इस्लामच्या इतर दोन मौलिक धारणांवर श्रद्धा ठेवतो. एक म्हणजे एकेश्वरत्व आणि दुसरी धारणा पैगंबरत्व होय. अशा प्रकारे मनुष्य ईश्वराच्या एकमेव असण्यावर तसेच त्याचा ग्रंथ व पैगंबरांवर श्रद्धा बाळगतो. पारलौकिक जीवनावर श्रद्धा ठेवल्याने मनुष्य एक सच्चा व विश्वासु श्रद्धावंत बनतो, याचा हा स्पष्ट पुरावा आहे. एक ईश्वर अल्लाह, एक ग्रंथ कुरआन व अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) या त्रिसूत्री मौलिक धारणांवर ईमान धारण करणाऱ्यास मुस्लिम (आज्ञाधारक) म्हणतात. असा आज्ञाधारक श्रद्धावंत (मुस्लिम) चांगल्या प्रकारे जाणून असतो की सृष्टीनिर्माता व पालक अल्लाह सर्व गोष्टींवर सत्ता राखून आहे आणि त्याचा एकन् एक शब्द व वचन सत्य आहे. म्हणूनच मुस्लिम पारलौकिक जीवनाविषयी आपल्या मनात शंका ठेवून नसतो. न पाहता व अनुभव न घेता तो पारलौकिक जीवनावर असा दृढ विश्वास ठेवतो जणूकाही त्याने प्रत्यक्ष डोळ्याने ते पाहिले आहे. हा स्वाभाविक परिणाम आहे ईशनिष्ठा व ईशश्रद्धाचा आणि ईशप्रदत्त बुद्धीविवेकाचा. दृढ श्रद्धा पारलौकिक जीवनावर असल्याने मनुष्याचे मन स्वच्छ बनते आणि एकेश्वरत्वावर एकनिष्ठ राहतो. कुरआन पारलौकिक जीवनावरील आशयाचे वर्णन सतत करीत आहे. परलोकत्व अमान्य करणाऱ्यांना कुरआनमध्ये प्रभावीपणे समजाऊन सांगण्यात आले आणि यासाठी कुरआन एका ओसाड (मृत) जमिनीचे उदाहरण देतो. पावसाची एक सर पडल्यानंतर ती मृत जमीन हिरवागार बनते, हा पुरावा कुरआन देत

आहे. कुरआन मनुष्याला या जीवनावर पारलौकिक जीवनास प्राधान्य देण्यास आग्रहाचे मार्गदर्शन करीत आहे.

*"निश्चितच तुमच्यासाठी पारलौकिक जीवन या जीवनापेक्षा उत्तम आहे."* *(दिव्य कुरआन, ९३:४)*

अशा प्रकारे कुरआन हा ग्रंथ पारलौकिक जीवनाविषयीचे शाश्वत स्मरण आहे. न्यायनिवाड्याच्या दिवसाचे स्मरण ज्याच्यासाठी ईश्वर चांगले व वाईट यात समतोल राखून या जगातील प्रत्येकाच्या कामगिरीची झाडाझडती घेईल. परलोकध्यास एकेश्वरत्व व ईशप्रदत्त इस्लामी जीवनपद्धतीवर कुरआन दृढ विश्वास ठेवणे भाग पाडतो आणि ईशमार्गदर्शनानुसार जीवन जगण्यास प्रवृत्त करतो. परलोकध्यास एक आवश्यक असे शक्तीस्रोत आहे ज्यामुळे नैतिकतेला जीवनात रुजविले जाते. अन्यथा नैतिक प्रणाली फक्त ईशग्रंथाची शोभा सिद्ध होते. ईशसान्निध्यात सतत राहणे आणि त्याचेच सतत बनून राहाणे यामुळे मनुष्य सदाचारी बनतो आणि दुराचाराला अव्हेरतो. म्हणूनच कुरआन मनुष्याला त्याच्या पालनकर्त्या रब समोर हजर होण्याचे सतत स्मरण करून देतो. या जगात मनुष्याला ईश्वराने बेलगाम व बेजबाबदार सोडून दिलेले नाही. मनुष्यात उत्तरदायित्वाची प्रखर भावना रुजविली जाते. त्याला सतत स्मरण राहते की ईश्वर पाहात आहे आणि ऐकत आहे. एके दिवशी या जगातील कामगिरीचा लेखाजोखा ईशन्यायालयात प्रत्येकाला सादर करावा लागेल. कुरआन अशा प्रकारे पारलौकिक जीवनाची प्रखर जाणीव ईमानधारकास करून देतो.

*पृथ्वी व आकाशातील सत्याचे अंतर्ज्ञान तर अल्लाहजवळच आहे आणि कयामत (पुनरुत्थान) येण्यास काहीच विलंब लागणार नाही. परंतु केवळ माणसाच्या डोळ्याचे पाते लवण्याएवढेच किंबहुना यापेक्षाही कमी. वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह सर्वकाही करू शकतो."*

*(दिव्य कुरआन, १६:७७)*

जगातील सर्व धर्म आणि आधुनिक विज्ञानानुसार हे जग एकेदिवशी नष्ट होणार आहे. याविषयीचा अनुत्तरित प्रश्न "हे जग नष्ट कसे होणार?" हा आहे. तसे पाहिले तर स्वत:ला स्वत:च्या अस्तित्वाविषयी चिंता लागून असते. याविषयी आस्तिक व नास्तिक दोन्ही चिंताग्रस्त आहेत. मृत्यु हा अंतिम टप्पा आहे काय? किंवा मृत्युनंतर काय आहे? याविषयी दोन्ही गट विचारमग्न आहेत. तरी काहींना मृत्युपश्चात जीवनावर विश्वास बसत

नाही आणि ते या जगातील जीवनालाच सर्वकाही मानून बसतात आणि मृत्युपश्चात काहीही नाही; अशी त्यांची धारणा बनते. यासाठी हे लोक सामान्य ज्ञानाचा व विज्ञानाचा आधार समोर ठेवतात. अशा स्थितीत हे लोक स्वत:ला इतरांपेक्षा अधिक जास्त प्रगतीशील समजतात आणि मृत्युपश्चात जीवनावर विश्वास ठेवणाऱ्यांना पुरातनवादी व सनातनी ठरवितात. अशा या तथाकथित पुरोगाम्यांना याची जाणीव नसते की अश्रद्धा ही श्रद्धाशीलतेइतकीच पुरातन आहे. कुरआन अवतरणासमयीसुद्धा हा विचार प्रचलित होता. त्यांचे विचार आजच्या 'पुरोगामी' विचारांप्रमाणेच होते.

*"त्याच्या राष्ट्रातील ज्या पुढाऱ्यांनी मानण्यास नकार दिला आणि परलोकाच्या अस्तित्वाला खोटे ठरविले.... ते म्हणू लागले, जीवन काहीच नाही, परंतु केवळ या जगातीलच जीवन, येथेच आम्हाला मरावयाचे व जगावयाचे आहे आणि आम्ही कदापि उठविले जाणार नाही."*

*(दिव्य कुरआन, २३:३३-३७)*

अशा प्रकारे कुरआन जगापुढे वस्तुस्थिती ठेवत आहे की प्रत्येक काळातील सुखवस्तु लोकांनीच तसेच समाजातील श्रीमंत शोषणकर्त्या वर्गाने 'मृत्युपश्चात जीवना'ला नाकारले आहे. असे लोक कधीही ईशभय बाळगून नव्हते आणि त्यांनी इतरांनासुद्धा सरळमार्ग स्वीकारण्यापासून रोखले आहे. आजसुद्धा हेच होत आहे.

या पुरोगामी लोकांच्या विचारांचा पोकळपणा कुरआन उघड करून दाखवित आहे. ते म्हणतात, ही सडलेली मातीमोल झालेली हाडे कशी पुन्हा निर्माण केली जाणार? कुरआन स्पष्टपणे उत्तर देत आहे की तो पुन्हा निर्माण करील ज्याने पहिल्यांदा निर्माण केले होते. ईश्वराला समस्त निर्मितीची जाण आहे.

*"काय मनुष्य पाहात नाही की आम्ही त्याला वीर्यापासून निर्माण केले आणि मग तो भांडखोर बनून उभा ठाकला? आता तो आम्हावर दृष्टांत लावीत आहे आणि आपल्या निर्मितीस विसरत आहे. सांगतो, "कोण या हाडांना जिवंत करील जेव्हा ती जीर्ण झाली असतील?" त्याला सांगा, यांना तोच जिवंत करील ज्याने यांना पूर्वी निर्मिले होते आणि तो निर्मितीचे प्रत्येक कार्य जाणतो. तोच ज्याने तुम्हांकरिता हिरव्यागार झाडापासून अग्नी उत्पन्न केला आणि तुम्ही त्यापासून आपल्या चुली प्रज्वलित करता. काय तो, ज्याने आकाश आणि पृथ्वी निर्माण केले; यावर प्रभुत्व राखत नाही की यासारख्यांना*

*निर्माण करू शकेल? का नाही, ज्याअर्थी तो निर्मितीत निष्णात आहे. तो तर जेव्हा एखाद्या वस्तूचा संकल्प करतो तेव्हा त्याचे काम फक्त एवढेच की तिला आज्ञा द्यावी की अस्तित्व धारण कर, आणि ती अस्तित्वात येते. पवित्र आहे तो ज्याच्या हाती प्रत्येक वस्तूचे संपूर्ण अधिपत्य आहे, आणि त्याच्याकडेच तुम्ही रुजू केले जाणार आहात.'' (दिव्य कुरआन, ३६:७७-८३)*

# दायित्वबोध

पारलौकिक जीवन ही एक वास्तविकता आहे, याचे कुरआन सतत स्मरण करून देत आहे. एकेश्वरत्वावर श्रद्धा ठेवल्याने स्वाभाविकतः मनुष्याला परलोकत्वावर श्रद्धा ठेवावी लागते. उत्तरदायित्वाशिवाय ईश्वराचे अस्तित्व शोभेचेच ठरते. कुरआन शिकवणीनुसार या जगातील जीवन एक परीक्षा आहे पुढील शाश्वत जीवनासाठीची. तो क्षण येणारच आहे जेव्हा संपूर्ण सृष्टी नष्ट केली जाईल आणि समस्त मानवजात पुन्हा जिवंत केली जाईल.

*''तुम्ही पाहत नाही काय अल्लाहने आकाश व पृथ्वीची निर्मिती सत्याधिष्ठित केली आहे? त्याने इच्छिले तर तो तुम्हा लोकांना घेऊन जाईल आणि तुमच्या जागी नवनिर्मिती करील. असे करणे त्याच्यासाठी काहीच कठीण नाही.'' (दिव्य कुरआन, १४:१९-२०)*

कयामतचा दिवस दुसऱ्या शाश्वत जीवनाची सुरवात असेल. ते जीवन शाश्वत जीवन असेल. त्या वेळी प्रत्येकाला त्याच्या या जगातील जीवनाच्या कामगिरीचा पुरेपूर मोबदला मिळेल, मग त्याने चांगले कार्य केले असेल अथवा वाईट कर्म. त्या दिवशी प्रत्येकाला न्याय मिळेल. प्रत्येकाची कर्मनोंदवही त्याच्यासमोर ठेवली जाईल आणि साक्षीदार न्यायालयात हजर केले जातील.

*''हे लोक म्हणतात की, ''ही पुनरुत्थानाची धमकी पूरी तरी केव्हा होणार? सांगा, जर तुम्ही खरे असाल.'' वास्तविकतः हे ज्या गोष्टीची वाट पाहात आहेत तो एक स्फोट आहे जो अकस्मात यांना अशा स्थितीत गाठील जेव्हा हे (आपल्या ऐहिक व्यवहारांत) भांडत असतील, आणि त्या वेळी हे मृत्यूपत्रदेखील करू शकणार नाहीत, आपल्या घरीदेखील परतू शकणार नाहीत. मग एक नरसिंघ फुंकले जाईल आणि अकस्मात हे आपल्या पालनकर्त्याच्या*

*पुढे हजर होण्याकरिता आपापल्या कबरीतून बाहेर पडतील. घाबरून म्हणतील, "हे आम्हाला आमच्या शयनगृहातून कोणी उठविले?" "ही तीच गोष्ट आहे जिचे परमदयाळू ईश्वराने वचन दिले होते आणि पैगंबरंचे प्रतिपादन सत्य होते." एकच प्रचंड मोठा आवाज होईल आणि सर्वच्या सर्व आमच्यासमोर हजर केले जातील. आज कोणावर यत्किंचितही अन्याय केला जाणार नाही आणि तुम्हाला तसाच मोबदला दिला जाईल जशी तुम्ही कृत्ये करीत होता. आज स्वर्गातील लोक मौज करण्यात मग्न आहेत. त्यांची जोडपी गडद छायेत आहेत. आसनावर लोड लावून, हर तऱ्हेचे स्वादिष्ट पदार्थ खाण्यापिण्यासाठी त्यांच्याकरिता तेथे उपलब्ध आहेत, जे काही ते मागतील त्यांच्यासाठी हजर आहे. परमकृपाळू पालनकर्त्याकडून त्यांना सलाम सांगितला गेला आहे." "आणि हे गुन्हेगारांनो, आज तुम्ही विभक्त व्हा, आदमच्या मुलांनो, मी तुम्हाला आदेश दिला नव्हता काय की सैतानाची भक्ती करू नका, तो तुमचा उघड शत्रू आहे आणि माझीच भक्ती करा, हा सरळमार्ग आहे? परंतु असे असूनदेखील त्याने तुमच्यापैकी एका मोठ्या गटाला मार्गभ्रष्ट केले. तुम्हाला सुबुद्धी नव्हती काय? हा तोच नरक आहे ज्याची तुम्हाला भीती दाखविली जात होती, जो द्रोह तुम्ही करीत होता त्यापायी आता त्याचे इंधन बना. आज आम्ही यांची तोंडे बंद करून टाकत आहोत, यांचे हात आम्हाला सांगतील आणि यांचे पाय ग्वाही देतील की हे जगात कोणती कमाई करीत होते."*

*(दिव्य कुरआन, ३६:४८-६५)*

न्यायनिवाड्याच्या दिवशी कोणावरही यत्किंचित अन्याय केला जाणार नाही आणि प्रत्येकाला त्याच्या कर्मानुसारच मोबदला देण्यात येईल.

*"आम्ही निश्चितच एके दिवशी मृतांना जिवंत करणार आहोत. जी काही कृत्ये त्यांनी केलेली आहेत, ती सर्व आम्ही लिहित आहोत आणि जे काही अवशेष त्यांनी मागे सोडले आहेत तेसुद्धा आम्ही अंकित करीत आहोत. प्रत्येक गोष्ट आम्ही एका उघड ग्रंथात नोंद करून ठेवली आहे."*

*(दिव्य कुरआन, ३६:१२)*

सत्याला नाकारणाऱ्यांना जेव्हा अल्लाहच्या न्यायालयात हजर होण्यासाठी घेरून आणले जाईल; याचा उल्लेख कुरआन त्या ईशद्रोहींना नरकात टाकण्यासाठी घेरून

आणले जाईल, असा करतो. कारण त्यांचा शेवट नरक हाच आहे.

*"आणि जरा त्यावेळेची कल्पना करा जेव्हा अल्लाहचे हे शत्रू नरकाग्नीकडे जाण्यासाठी घेरून आणले जातील. यांच्यापुढे गेलेल्यांना नंतर येणाऱ्यांच्या आगमनापर्यंत रोखून धरले जाईल, मग जेव्हा सर्वजण तेथे पोहचतील तेव्हा त्यांचे कान व त्यांचे डोळे आणि त्यांच्या शरीराची त्वचा त्यांच्यावर साक्ष देतील की ते जगात काय काय करीत राहिले आहेत. ते आपल्या शरीराच्या त्वचांना म्हणतील, "तुम्ही आमच्याविरूद्ध साक्ष का दिली?" त्या उत्तर देतील, "आम्हाला त्याच अल्लाहने वाणी दिली आहे ज्याने प्रत्येक वस्तूला बोलके केले आहे. त्यानेच तुम्हाला पहिल्यांदा निर्माण केले होते आणि आता त्याच्याकडेच तुम्ही परत आणले जात आहात. तुम्ही जगात अपराध करतेवेळी जेव्हा लपत होता तेव्हा तुम्हाला याचा विचार नव्हता की कधी तुमचे स्वत:चे कान, आणि तुमचे डोळे व तुमच्या शरीराच्या त्वचा तुम्हावर साक्ष देतील किंबहुना तुम्ही तर असे समजला होता की तुमच्या पुष्कळशा कृत्यांची अल्लाहलासुद्धा खबर नाही. तुमची हीच धारणा जी तुम्ही आपल्या पालनकर्त्यासंबंधी केली होती, तिनेच तुम्हाला बुडविले आणि तिच्याचमुळे तुम्ही तोट्यात आला." अशा स्थितीत ते सहन करो (अथवा न करो); अग्नीच त्यांचे ठिकाण असेल आणि जर रुजू होण्याची संधी इच्छितील तर कोणतीही संधी त्यांना दिली जाणार नाही."*

*(दिव्य कुरआन, ४१:१९-२४)*

अशा प्रकारे हे सत्याला नाकारणारे ईश्वरापुढे आवर्जुन विनवणी करतील की त्यांना जगात पुन्हा परत पाठविले तर ते इस्लामचा स्वीकार करून सदाचार करतील आणि श्रद्धाहीनतेचा व अनेकेश्वरत्वाचा त्याग करतील. अशा रितीने ते लोक इस्लाम स्वीकारण्यासाठी त्या वेळी शपथांवर शपथा घेतील, परंतु त्याचा काहीच उपयोग होणार नाही. लोकांना तर जगातच सावध करण्यात आले होते की त्यांना दुसरी संधी दिली जाणार नाही. जगातील हे जीवन एकदाचेच आहे. या जगातील जीवन तर परलोक जीवनाची शेती आहे. तुम्ही येथे जे पेराल तेच तुमच्यासाठी तिथे उगवणार आहे. म्हणूनच पापींना तिथे कायमचेच दु:ख नरक रूपात आणि सदाचारींना शाश्वत असे सुख - समाधान जन्नत रूपाने मिळेल. पापींना फरिश्ते ईशन्यायालयानंतर नरकात फेकून देतील आणि नेक - सदाचारी श्रद्धावंतांचे स्वागत जन्नतमध्ये फरिश्ते करतील.

परलोकत्व या मौलिक धारणेचे अंतिम विधान हे स्वर्ग (जन्नत) व नरक (जहन्नम) आहे. हे अंतिम विधानसुद्धा अशक्य नाही. ईश्वराने चंद्र, सूर्य, ग्रह-तारे व ही सृष्टी निर्माण केली. तो स्वर्ग व नरक निर्माण करण्यास असमर्थ आहे काय? ईशन्यायालयात झाडाझडती झाल्यानंतर व निर्णय झाल्यानंतर सदाचारींना जन्नतचे सुख व दुराचारींसाठी नरक यातना देणे ही न्यायाची निकड आहे. कयामतच्या दिवशी जेव्हा ईश्वर त्याचे न्यायालय भरविल आणि तिथे प्रत्येकाची जाबविचारणा होईल आणि प्रत्येकाविषयी न्यायाधिष्ठित फैसला होईल. सदाचारींना चांगला मोबदला आणि दुराचारींना शिक्षा. म्हणून असे एक शाश्वत ठिकाण असणे आवश्यक आहे जिथे सदाचारींना त्यांचा मोबदला, सन्मान, सुख-समाधान व प्रसन्नतेच्या स्वरूपात मिळण्यासाठी जन्नत (स्वर्ग) आणि दुराचारींना शिक्षेरूपात अपमान, दुःख व यातना भोगण्यासाठी नरक (जहन्नम) असेल.

अधिकांश मानवजातीला शांततापूर्ण जीवन जगावेसे वाटते. समाजात फार थोडे समाजकंटक असतात, जे संपूर्ण समाजाचे जगणे कठीण करून टाकतात. या समाजकंटकांना, देशद्रोहीना, अतिरेक्यांना व दहशतवाद्यांना असेच सोडून दिले जाईल काय? या जगातील कोर्टात ते शक्यतो सहीसलामत सुटतील. याचा अर्थ त्या नराधमांना शिक्षा होणारच नाही? ईश्वर अशा अमानुष कृत्ये करणाऱ्यांना शिक्षा देईलच. समाजात मानवी संहार, अत्याचार, भ्रष्टाचार माजविणाऱ्यांना ईशन्यायालयात योग्य शिक्षा मिळणारच. या जगात पापी, गुंड, दुराचारी व समाजकंटक लोक राजकारणात व व्यापारात यशस्वी झालेले आपण पाहात आहोत, तर दुसरीकडे या जगात सदाचारी नेक माणसं हलाखीचे व दुःखी जीवन जगत आहेत. या जगातील ही स्थिती सर्वसामान्य माणसाला बुचकळ्यात टाकते. ही स्थिती तर ईशन्यायाविरूद्ध आहे. गुन्हेगार पापी लोक मानवनिर्मित कायद्यातून व या जगातील न्यायालयात निर्दोष सुटले आणि या जगात हेच लोक प्रगतीच्या उच्च शिखरावर विराजमान होतात. मग अशा स्थितीत सदाचारी लोकांसाठी काय उरते? या जगात अशा स्थितीत नैतिकता व चांगुलपणाला बळ कसे प्राप्त होईल? चांगुलपणास बक्षीस व दुष्टाला शिक्षा देण्याची अवस्था असलीच पाहिजे. हे जर या जगात घडत नसेल आणि सर्वांना ठाऊक आहे की असे घडत नाही. म्हणून एकेदिवशी न्याय स्थापित होणे काळाची गरज आहे आणि तो दिवस 'न्यायनिवाड्याचा दिवस' म्हणजे अंतिम दिवस असेल. एखाद्याच्या कामगिरीचे उत्तरदायित्व ही न्यायाची अत्यावश्यक गरज आहे. गरीब, कमजोर व सदाचारी तसेच इतर सर्वांची दायित्व ही गरज आहे, ज्यांना न्यायाची चाड आहे. पारलौकिक जीवनावर तसेच न्यायनिवाड्याच्या दिनावरील श्रद्धा फक्त पारलौकिक जीवनाच्या सफलतेची

ग्वाही देत नाही तर या जगातील सुख-शांती व कल्याणाचीसुद्धा साक्ष देते. या जगात प्रत्येकाला आपल्या कर्मांच्या उत्तरदायित्वाची प्रखर जाणीव मनात खोलवर रुजविली जाऊन आजच्या ज्वलंत समस्यांची उकल याचमुळे होते.

मनुष्यजातीचे कल्याण तिच्या निर्माणकर्त्याशी योग्य संबंध स्थापित करण्यात आहे. सृष्टीचे व मनुष्याचे अस्तित्व हे विनाकारण नाही तर निर्माणकर्त्या प्रभुसमोर आपल्या सर्वांची जाबविचारणा होईल,ज्याच्याकडे आम्हा सर्वांना शेवटी परत जावयाचे आहे. या ठिकाणी हा प्रश्न एखाद्याच्या मनात येणे साहजिक आहे की 'अल्लाहला मनुष्याच्या कर्मांबद्दल इतकी काळजी का आहे?' कुरआन या प्रश्नाचे उत्तर स्पष्ट देत आहे की, अल्लाहसाठी मनुष्यकर्म निरर्थक आहेत. तसेच मनुष्याचे स्वत:चे कर्म त्याच्याच उपयोगाचे आहेत.

*"जो कोणी अल्लाहशी भेट होण्याची अपेक्षा बाळगतो (त्याला माहीत व्हावे की) अल्लाहने निश्चित केलेली वेळ येणारच आहे, आणि अल्लाह सर्वकाही ऐकतो व जाणतो. जो कोणी प्रयत्नांची पराकाष्ठा करील, स्वत:च्याच कल्याणाकरिता करील. अल्लाह निश्चितच जगवासियांपासून निरपेक्ष आहे. आणि जे लोक श्रद्धा ठेवतील आणि सत्कृत्ये करतील त्यांच्यातील वाईट आम्ही दूर करू आणि त्यांना त्यांच्या सर्वोत्कृष्ट कृत्यांचा मोबदला देऊ."*
*(दिव्य कुरआन, २९:५-७)*

मनुष्यआत्म्याची मुक्ती या जीवनात व पारलौकिक जीवनात त्याच वेळी होईल जेव्हा मनुष्य आपले जीवन ईशआज्ञेनुसार व ईशमार्गदर्शनानुसार पार पाडील. म्हणजेच मनुष्याला मुक्ती दोन्ही जगात तेव्हाच प्राप्त होईल जेव्हा मनुष्य कुरआन व अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीनुसार या जगात जीवनयापन करेल. मनुष्यजातीचे या सृष्टीत एक विशिष्ट स्थान आहे. सृष्टीतील सर्वकाही मनुष्यसेवेसाठी आहे. सूर्य मनुष्यजातीच्या सेवेत कार्यरत आहे. वृक्ष, पशु-पक्षी मनुष्यासाठी आहेत. खरेतर सृष्टीतील प्रत्येक वस्तु मनुष्याच्या गरजपूर्तीसाठी आहे. तर मग मनुष्यजीवन कशासाठी आहे?

*"तो अल्लाहच तर आहे ज्याने तुमच्यासाठी समुद्रास अधीन केले जेणेकरून त्याच्या हुकूमाने नौका त्याच्यात चालतील आणि तुम्ही त्याचा कृपाप्रसाद शोधावा व कृतज्ञ बनावे. त्याने पृथ्वी व आकाशांतील सर्वच वस्तू तुमच्या अधीन केल्या. सर्वकाही आपल्या जवळून, यात मोठे संकेत आहेत*

*त्या लोकांसाठी जे गंभीरतापूर्वक विचार करणारे आहेत.''*

*(दिव्य कुरआन, ४५:१२-१३)*

या जगात प्रयत्नांची पराकाष्टा केल्यानंतर मनुष्यआत्मा उन्नत होत जातो जेणेकरून या जगात ईश्वराचा प्रतिनिधी या उच्चपदासाठी त्याने योग्यताप्राप्त बनावे.

*''निसंशय अल्लाह आकाश आणि पृथ्वीतील प्रत्येक अदृष्य वस्तूपासून परिचित आहे. तो तर अंत:करणातील गुप्त रहस्यदेखील जाणतो. तोच तर आहे ज्याने तुम्हाला पृथ्वीतलावर खलीफा (उत्तराधिकारी) बनविले आहे. आता जो कोणी द्रोह करतो, त्याच्या द्रोहाचे अरिष्ट त्याच्यावरच आहे. आणि अश्रद्धावंतांना (काफिर) त्यांचा द्रोह (कुफ्र) याव्यतिरिक्त कसलीही वाढ देणार नाही की त्यांच्या पालनकर्त्याचा प्रकोप त्यांच्यावर जास्तीत जास्त भडकत जाईल अश्रद्धावंतांसाठी (काफिर) हानीत वाढीशिवाय कोणतीही वृद्धी नाही.''*

*(दिव्य कुरआन, ३५:३८-३९)*

विश्वासू दासाचे आयुष्य हे त्याच्या निर्मात्याच्या प्रसन्नतेसाठीच असते. दासाने जेव्हा आपल्या मालकाचे आदेश धुडकावले, त्याची अवज्ञा केली आणि त्याच्याशी विद्रोह केला तर दासासाठी शिक्षेशिवाय दुसरे काही उरत नाही. बुद्धिमान लोक आपल्या स्वामीचे हक्क, जबाबदाऱ्या व आदेशांना जाणून असतात, परंतु दुसरीकडे निर्बुद्ध, हट्टी व पूर्वग्रहदूषित लोक हे सर्व विसरून या जगात ध्येयहीन जीवन जगतात.

*''तो ज्याला इच्छितो त्याला विवेक प्रदान करतो, आणि ज्याला विवेक लाभला त्याला खऱ्या अर्थी मोठी दौलत लाभली. या गोष्टीपासून केवळ तेच लोक बोध घेतात जे विवेकशील आहेत.''*

*(दिव्य कुरआन, २:२६९)*

# पारलौकिक जीवन (आखिरत)

## माणसाचा मृत्यु

(१) सरतेशेवटी प्रत्येकाला मृत्यु आहेच आणि तुम्ही सर्वजण आपापले पुरेपूर मोबदले प्रलयाच्या दिवशी प्राप्त करणार आहात.

*"सरतेशेवटी प्रत्येकाला मृत्यू आहे आणि तुम्ही सर्वजण आपापले पुरेपूर मोबदले कयामतच्या दिवशी प्राप्त करणार आहात. यशस्वी खऱ्या अर्थी तोच आहे जो तेथे नरकाग्नीपासून वाचेल व स्वर्गामध्ये दाखल केला जाईल. उरले हे जग, तर ही केवळ एक भुरळ पाडणारी बाब आहे."* (दिव्य कुरआन, ३:१८५)

(२) तुम्ही जेथे कोठे असाल तेथे मृत्यु तुम्हाला गाठणारच. मग तुम्ही कितीही मजबूत व भक्कम इमारतीत असा.

*"यांना सांगा, ऐहिक जीवनाचे भांडवल फार थोडे आहे आणि परलोक ईशपरायण माणसाकरिता अधिक उत्तम आहे आणि तुम्हावर जुलूम तिळमात्रदेखील केला जाणार नाही. उरला मृत्यू तर जेथे कोठे तुम्ही असाल तो कोणत्याही परिस्थितीत तुम्हाला येणारच, मग तुम्ही कितीही मजबूत इमारतीत असा."* (दिव्य कुरआन, ४:७७-७८)

(३) धर्माखातर जर स्वदेशत्याग (हिजरत) करावा लागला तर मृत्युच्या भयाने त्यापासून तुम्ही पळ काढावा, असे होता कामा नये.

*"जो कोणी अल्लाहच्या मार्गात देशांतर करील तो पृथ्वीवर आश्रय घेण्यासाठी मुबलक जागा व उदरनिर्वाहासाठी मोठी सुबत्ता प्राप्त करील आणि जो आपल्या घरातून अल्लाह व पैगंबरकडे देशांतरासाठी निघाला, नंतर त्याला वाटेतच मृत्यू आला, त्याचा मोबदला अल्लाहच्या जवळ अनिवार्य ठरला, अल्लाह फार क्षमा करणारा व कृपाळू आहे."*

(दिव्य कुरआन, ४:१००)

(४) मृत्युसमयी प्राणहरण करणारे दूत आपल्या कर्तव्याची अंमलबजावणी करण्यात कसलीही कसूर करत नाहीत.

*"सरतेशेवटी त्याच्याकडेच तुम्हाला परत जायचे आहे, मग तो तुम्हाला दाखवून देईल की तुम्ही काय करीत होता. आपल्या दासांवर तो संपूर्ण*

*प्रभुत्व राखतो आणि तुमच्यावर निरीक्षक नियुक्त करून पाठवितो, येथपावेतो की जेव्हा तुमच्यापैकी एखाद्याची मृत्यूघटका येऊन ठेपते तेव्हा त्याने पाठविलेले दूत त्याचे प्राण हरण करतात व आपले कर्तव्य बजावण्यात जरा देखील चूक करीत नाहीत.'' (दिव्य कुरआन, ६:६०-६१)*

(५) अल्लाहच्या विरोधात शिरजोरी करणाऱ्यांचे प्राण दूत कठोरतेने व अपमानजनक यातना देत हरण करतात.

*''किती छान होईल बरे जर तुम्ही अत्याचाऱ्यांना अशा दशेत पाहू शकाल जेव्हा ते मृत्यूच्या घरघरीत गटांगळ्या घेत असतील आणि दूत हात पुढे करून करून सांगत असतील, आणा, काढा आपले प्राण!''*

*(दिव्य कुरआन, ६:९३)*

(६) अल्लाहच्या इन्कार करणाऱ्यांना मृत्युसमयी जाणीव होऊन चुकते की त्यांनी सत्याचा इन्कार केलेला आहे.

*''ती घटका येऊन ठेपेल जेव्हा आमचे पाठविलेले दूत त्यांचे प्राणहरण करण्याकरिता पोहोचतील. त्यावेळेस ते त्यांना विचारतील की सांगा, ''आता कोठे आहेत तुमचे आराध्य दैवत ज्यांचा तुम्ही अल्लाहच्या ऐवजी धावा करीत होता?'' ते सांगतील, ''ते सर्व आम्हापासून लोप पावले.'' ते स्वत: आपल्याविरूद्ध साक्ष देतील की खरोखरच आम्ही सत्य नाकारणारे होतो. अल्लाह फर्मावील, ''जा, तुम्हीसुद्धा त्याच नरकामध्ये दाखल व्हा ज्यात तुमच्यापूर्वी होऊन गेलेले जिन्न व मानवसमूह दाखल झाले आहेत.'' (दिव्य कुरआन, ७:३७-३८)*

(७) सत्याचा इन्कार करणाऱ्यांचे प्राणहरण करताना दूत त्यांना अत्याधिक यातना देत असतात.

*''जर तुम्ही ते दृश्य पाहू शकला असता तर किती छान झाले असते! जेव्हा दूत विद्रोहींचे प्राण हरण करताना त्यांच्या चेहऱ्यावर व पाठीवर मारा करीत म्हणत होते, ''घ्या आता जळण्याची शिक्षा भोगा, हा तो मोबदला आहे ज्याची सामग्री तुम्ही स्वहस्ते अगोदरच उपलब्ध करून ठेवलेली होती, एरव्ही अल्लाह तर आपल्या दासांवर मुळीच अत्याचार करणारा नव्हे.'' (दिव्य कुरआन, ८:५०-५१)*

(८) शिरजोरी व अवज्ञा करणारे मृत्युसमयी लोटांगण घालून आपण निरपराध

असल्याचे बहाणे करीत असतात.

*"होय, त्याच ईमान धारण न करणाऱ्यांसाठी जे आपल्या स्वत:वर अत्याचार करताना जेव्हा दूतांच्या हाती पकडले जातात (तेव्हा शिरजोरी सोडून) लगेच लोटांगण घालतात आणि म्हणतात, "आम्ही तर काही अपराध करीत नव्हतो." दूत उत्तर देतात, "करीत नव्हता! अल्लाह तुमची कृत्ये चांगल्याच प्रकारे जाणतो. आता जा, नरकाच्या दारांत शिरा, तेथेच तुम्हाला सदैव राहावयाचे आहे." तर वस्तुस्थिती अशी आहे की ते अत्यंत वाईट ठिकाण आहे अहंकारी लोकांकरिता."*

*(दिव्य कुरआन, १६:२८-२९)*

**(९)** ईशभीरू (ईशपरायण) लोकांचे प्राणहरण करताना दूत त्यांच्या सुखरुपतेचे शुभचिंतन करतात.

*"अशा प्रकारच्या पुण्यकर्मी लोकांसाठी या जगातही कल्याण आहे आणि परलोकातील घर तर हमखास त्यांच्यासाठी उत्तम आहे. फारच चांगले घर आहे. ईशपरायण लोकांचे. चिरंतन निवासाचे स्वर्ग ज्याच्यात ते दाखल होतील, खालून कालवे वाहात असतील आणि सर्व काही तेथे अगदी इच्छेप्रमाणे असेल. असा मोबदला देतो अल्लाह ईशपरायण लोकांना. त्या ईशपरायणांना ज्यांचे आत्मे शुचिर्भूत अवस्थेत जेव्हा दूत हरण करतात तेव्हा म्हणतात, "सलाम असो तुम्हांवर या स्वर्गामध्ये आपल्या कर्माच्या मोबदल्यात." (दिव्य कुरआन, १६:३०-३२)*

**(१०)** या जगात प्रत्येक सजीवाला मृत्युची चव चाखावयाची आहे. चांगल्या किंवा वाईट अवस्थेत त्याची परीक्षा घेतली जात असते.

*"आणि हे पैगंबर (स.)! तुमच्यापूर्वी आम्ही कोणाला सुद्धा चिरकाल ठेवले नाही. जर तुम्ही मर्त्य झाला तर हे लोक काय अमर्त्य राहू शकतील? प्रत्येक जीवीतास मृत्यूची चव चाखावयाची आहे. आणि आम्ही चांगल्या व वाईट स्थितीत आणून तुम्हा सर्वांची परीक्षा घेत आहोत. सरतेशेवटी तुम्हाला आमच्याकडेच रुजू व्हायचे आहे."*

*(दिव्य कुरआन, २१:३४-३५)*

**(११)** अल्लाहपासून गाफील लोक मृत्युसमयी इच्छितात की त्यांना पुन्हा जगात परत पाठविले जावे जेणेकरून ते सत्कृत्ये करतील.

*"(हे लोक आपल्या कृत्यापासून परावृत्त होणार नाहीत) इथपावेतो की जेव्हा यांच्यापैकी एखाद्याला मरण येईल तेव्हा सांगू लागेल की, "हे माझ्या पालनकर्त्या, मला त्याच जगात परत पाठव, जे मी सोडून आलो आहे, आशा आहे की मी आता सत्कर्म करीन." मुळीच नाही, ही तर केवळ एक गोष्ट आहे जी तो बरळत आहे."*

*(दिव्य कुरआन, २३:९९-१००)*

**(१२)** प्रत्येक प्राणिमात्राला मृत्युचा आस्वाद घ्यावा लागणार आहे आणि परतून त्याला अल्लाहकडेच जायचे आहे.

*"हे माझ्या दासांनो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, माझी भूमी विशाल आहे, म्हणून तुम्ही माझीच भक्ती करीत राहा. प्रत्येक सजीवाला मृत्यूचा आस्वाद घ्यावा लागणार आहे. मग तुम्ही सर्व आमच्याकडेच परतवून आणले जाणार आहात."* *(दिव्य कुरआन, २९:५६-५७)*

**(१३)** तुमच्यासाठी नियुक्त केलेला दूतच तुमचे प्राणहरण करील.

*"आणि हे लोक म्हणतात, "जेव्हा आम्ही मातीत मिसळून गेलेले असू तेव्हा काय आम्ही पुन्हा नव्यानेच निर्माण केले जाऊ?" खरी गोष्ट अशी आहे की हे आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा इन्कार करणारे आहेत, यांना सांगा, "मृत्यूचा तो दूत जो तुम्हावर नियुक्त केला गेला आहे, तुम्हाला पुरेपूर आपल्या ताब्यात घेईल आणि मग तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडे परत आणले जाल."(दिव्य कुरआन, ३२:१०-११)*

**(१४)** अल्लाह नाराज होईल अशा मार्गाने चालणाऱ्यांचे प्राणहरण करताना दूत (फरिश्ते) त्यांना क्लेशदायक यातना देतील.

*"मग त्या वेळी काय दशा होईल जेव्हा दूत यांचे प्राण हरण करतील आणि यांच्या तोंडावर व पाठीवर मारत यांना नेतील? हे या कारणास्तव होईल की यांनी त्या पद्धतीचे अनुसरण केले जी अल्लाहला नाराज करणारी आहे आणि त्याच्या प्रसन्नतेचा मार्ग अवलंबिणे पसंत केले नाही, यापायीच त्याने यांची सर्व कृत्ये वाया घालविली."*

*(दिव्य कुरआन, ४७:२७-२८)*

**(१५)** मृत्युकळा येताच वास्तविकता माणसासमोर येईल.

*"मग पाहा ती मृत्यूकळा सत्यानिशी येऊन ठेपली, ही तीच गोष्ट आहे*

*ज्यापासून तू पळ काढीत होतास. आणि मग नरसिंघ फुंकले गेले. हा आहे तो दिवस ज्याचे भय तुला दाखविले जात होते.''*

*(दिव्य कुरआन, ५०:१९-२०)*

**(१६)** प्राण जेव्हा कंठात येऊन घरघरतो तेव्हा मरणारा माणूस तुमच्या तुलनेत अल्लाहच्या अधिक जवळ असतो.

*''आता जर तुम्ही कुणाचे आज्ञांकित नसाल आणि आपल्या या विचारांत खरे आहात, तर जेव्हा मरणाऱ्याचा जीव कंठापर्यंत पोहचलेला असतो आणि तुम्ही डोळ्याने पाहत असता की तो मरत आहे तेव्हा त्याच्या निघत असलेल्या प्राणाला परत का आणत नाही? त्यावेळी तुमच्यापेक्षा त्याच्या अधिक जवळ आम्ही असतो परंतु तुम्हाला दिसत नाही.''*

*(दिव्य कुरआन, ५६:८३-८५)*

**(१७)** मृत्युसमयी माणसाची अशी इच्छा असते की त्याला आणखीन थोडी सवड मिळावी जेणेकरून त्याला दानपुण्य करता यावे आणि सदाचारी बनता यावे.

*''जी उपजीविका आम्ही तुम्हाला दिली आहे तिच्यातून खर्च करा यापूर्वी की तुमच्यापैकी एखाद्याची मृत्यूघटका (जवळ) येईल आणि त्यावेळी तो म्हणेल, ''हे माझ्या पालनकर्त्या, का बरे तू मला थोडीशी आणखी सवड दिली नाही की मी सदका (दान) केला असता आणि सदाचारी लोकांत सामील झालो असतो.'' वास्तविक पाहता जेव्हा एखाद्याचा कार्यकालावधी पूर्ण होण्याची वेळ येते तेव्हा अल्लाह कोणत्याही व्यक्तीला अधिक सवड देत नसतो. आणि जे काही तुम्ही करता; अल्लाह त्याची खबर राखणारा आहे.''* *(दिव्य कुरआन, ६३:१०-११)*

**(१८)** जेव्हा प्राण कंठात येईल तेव्हा कसल्याही मंत्रातंत्राचा उपयोग होणार नाही.

*''कदापि नाही जेव्हा प्राण कंठापर्यंत पोहोचेल आणि म्हटले जाईल की आहे का कोणी मंत्र-तंत्र करणारा, आणि मनुष्य समजून घेईल की ही जगाशी ताटातूट होण्याची वेळ आहे, आणि पायात पाय अडकतील. तो दिवस असेल तुझ्या पालनकर्त्याकडे जाण्याचा.''*

*(दिव्य कुरआन, ७५:२६-३०)*

**(१९)** तुम्हा लोकांना अधिकाधिक आणि दुसऱ्या जास्त धन मिळविण्याच्या मोहाने गाफील करून टाकले आहे, येथपावेतो की त्याच विवंचनेत तुम्ही कबरीपर्यंत

पोहोचता.

*"तुम्हा लोकांना अधिकात अधिक व एकदुसऱ्यापेक्षा जास्त धन प्राप्त करण्याच्या मोहाने बेसावध करून टाकले आहे इथपावेतो की (याच चिंतेत) तुम्ही थडग्यापर्यंत पोहचता, कदापि नाही, लवकरच तुम्हाला कळून येईल." (दिव्य कुरआन, १०२:१-३)*

## मृत्युपश्चात

**(२०)** अल्लाहच्या मार्गात ठार झालेल्यांना मृत म्हणू नका ते जिवंत आहेत.

*"हे श्रद्धावंतांनो, संयम आणि नमाजचे सहाय्य घ्या. अल्लाह संयमी लोकांच्या सोबत आहे. आणि जे अल्लाहच्या मार्गामध्ये मारले जातील त्यांना मृत म्हणू नका असे लोक तर वास्तविक जिवंत आहेत, परंतु त्यांचं जीवन तुम्ही जाणत नाही."(दिव्य कुरआन, २:१५३-१५४)*

**(२१)** जे लोक अल्लाहच्या मार्गात ठार झाले त्यांना मृत समजू नका. ते जिवंत असून आपल्या पालनकर्त्याजवळून उपजीविका घेत आहेत.

*"जे लोक अल्लाहच्या मार्गात ठार झाले त्यांना मृत समजू नका, ते तर खरे पाहता जिवंत आहेत, आपल्या पालनकर्त्यापाशी उपजीविका प्राप्त करीत आहेत, जे काही अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना दिले आहे त्यावर ते फार खूश आहेत, आणि समाधानी आहेत.'*

*(दिव्य कुरआन, ३:१६९-१७०)*

**(२२)** मृत्युपश्चात कयामत (प्रलय) पर्यंत माणसाची उत्कट इच्छा असतानाही तो जगात पुन्हा येऊ शकत नाही.

*"हे माझ्या पालनकर्त्या प्रभु, मला त्याच जगात परत पाठव, जे मी सोडून आलो आहे.... मुळीच नाही,.... आता या सर्व (मरणाऱ्यांच्या) मागे एक आडपडदा (बरज़ख) आहे कयामतच्या दिवसापर्यंत."*

*(दिव्य कुरआन, २३:९९-१००)*

**(२३)** मृत्यु पावल्यापासून कयामतपर्यंत काफिरांना सकाळ संध्याकाळ नरकाग्नीसमोर हजर केले जाते.

*"आणि फिरऔनचे सोबती स्वत: अत्यंत वाईट प्रकोपाच्या चक्रात सापडले. नरकाग्नी आहे ज्याच्यापुढे ते सकाळ-संध्याकाळ पेश केले जातील."*
*(दिव्य कुरआन, ४०:४५-४६)*

**(२४)** मृत्युनंतर माणसाचा देह जसा मातीत मिसळतो ते अल्लाहला ज्ञात असते.

*"काय जेव्हा आम्ही मरू आणि माती बनून जाऊ (तेव्हा दुसऱ्यांदा उठविले जाऊ? हे पुनरागमन तर बुद्धीपलीकडचे आहे. (वास्तविकता) जमीन यांच्या शरीरातून जे काही खाते, ते आम्हाला ज्ञात आहे आणि आमच्याजवळ एक ग्रंथ आहे ज्यात सर्वकाही सुरक्षित आहे."*
*(दिव्य कुरआन, ५०:३-४)*

# प्रलय (कयामत)चे आगमन

**(२५)** लोक या जगात ज्या गोष्टीवर मतभेद करतात त्याचा निर्णय अल्लाह प्रलयाच्या दिवशी देऊन टाकील.

*"यहुदी (ज्यू) लोक म्हणतात, "ख्रिस्तींच्या जवळ काहीही नाही." ख्रिस्ती म्हणतात "यहुद्यांपाशी काहीही नाही." वास्तविक दोघेही ग्रंथ वाचताहेत. आणि अशाच प्रकारे त्या लोकांचेही दावे आहेत ज्यांना ग्रंथाचे ज्ञान नाही. ज्या ज्या मतभेदांमध्ये ते पडले आहेत त्यांचा निर्णय अल्लाह पुनरुत्थानाच्या दिवशी करील." (दिव्य कुरआन, २:११३)*

**(२६)** तुम्ही जेथे कोठे असाल, तेथून अल्लाह तुम्हां सर्वांना एकत्रित करील.

*"प्रत्येकासाठी एक दिशा आहे जिकडे तो वळतो. तेव्हा तुम्ही सत्कर्मात एकमेकांपेक्षा अग्रेसर व्हा. जिथे कुठे तुम्ही असाल तिथे अल्लाह तुम्हाला एकत्रित करील. निसंशय ईश्वर सर्व गोष्टींवर सामर्थ्यवान आहे."*
*(दिव्य कुरआन, २:१४८)*

**(२७)** कयातम (प्रलय) च्या दिवशी काहीजण उज्वलमुख असतील व काहींचे चेहरे काळे पडतील.

*"ज्यांनी हे वर्तन अवलंबिले ते त्या दिवशी कठोर शिक्षा भोगतील जेव्हा काहींचे चेहरे तेज:पुंज असतील तर काहींचे चेहरे काळवंडलेले असतील.*

*ज्यांचे चेहरे काळवंडतील (त्यांना सांगण्यात येईल की) श्रद्धेची देणगी मिळाल्यानंतर अश्रद्धावंतांप्रमाणे वर्तन करता? बरे तर आता या कृतघ्नतेच्या मोबदल्यात प्रकोपाचा आस्वाद घ्या. उरले ते लोक ज्यांचे चेहरे तेज:पुंज असतील तर त्यांना अल्लाहच्या कृपाछत्राखाली जागा मिळेल आणि ते सदैव त्याच अवस्थेत राहतील.'' (दिव्य कुरआन, ३:१०५-१०७)*

**(२८)** कयामतच्या दिवशी अल्लाह मृतांना पुन्हा जिवंत करील आणि सर्वांना त्याच्या न्यायालयात हजर राहण्यासाठी आणले जाईल.

*''जर अल्लाहने इच्छिले असते तर या सर्वांना सन्मार्गावर जमा केले असते, म्हणून अज्ञानी बनू नका. सत्याच्या आवाहनास तेच प्रतिसाद देतात जे ऐकणारे आहेत! मृतांना तर अल्लाह कबरीतूनच उठवील आणि नंतर ते (त्याच्या न्यायालयात सादर होण्यासाठी) परत आणले जातील.''*
*(दिव्य कुरआन, ६:३५-३६)*

**(२९)** ज्या दिवशी नरसिंघ फुंकले जाईल त्या दिवशी बादशाही त्याचीच असेल.

*''त्याचे कथन सर्वस्वी सत्य आहे आणि ज्या दिवशी नरसिंग फुंकले जाईल त्या दिवशी सत्ता त्याचीच असेल, तो परोक्ष आणि अपरोक्ष प्रत्येक वस्तूचा ज्ञाता आहे आणि बुद्धिमान व जाणकार आहे.''*
*(दिव्य कुरआन, ६:७३)*

**(३०)** जसे आता तुम्हाला त्याने निर्माण केले आहे, तसेच तुम्ही पुन्हा निर्माण केले जाल.

*''त्याचे सच्चे भक्त होऊन त्यालाच पुकारा, ज्याप्रमाणे त्याने आता तुम्हाला निर्माण केले आहे तसेच तुम्ही पुन्हा निर्माण केले जाल.''*
*(दिव्य कुरआन, ७:२९)*

**(३१)** तुम्हा सर्वांना त्याच्याकडेच परतावयाचे आहे.

*''त्याच्याकडेच तुम्हा सर्वांना परतावयाचे आहे, हे अल्लाहचे पक्के वचन आहे. नि:संशय निर्मितीचा प्रारंभ तोच करतो, मग तोच दुसऱ्यांदा निर्माण करील जेणेकरून ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली व ज्यांनी सत्कृत्ये केली त्यांना न्यायपूर्ण मोबदला द्यावा, आणि ज्यांनी विद्रोही पद्धत अवलंबिली*

*त्यांनी उकळते पाणी प्यावे व दु:खदायक शिक्षा भोगावी, सत्याच्या त्या इन्कारापायी जे ते करीत राहिले.'' (दिव्य कुरआन, १०:४)*

(३२) ज्या दिवशी अल्लाह त्यांना एकत्रित करील तेव्हा हेच ऐहिक (या जगातील) जीवन त्यांना असे वाटू लागेल जणू ते केवळ एक घटकाभरच तेथे थांबले होते.

*''लोक स्वत:च आपल्यावर अत्याचार करतात. (आज हे ऐहिक जीवनात मस्त आहेत) आणि ज्या दिवशी अल्लाह यांना एकत्र करील तेव्हा (हेच ऐहिक जीवन यांना असे वाटू लागेल) जणू हे केवळ एक घटकाभर आपापसात ओळख करून घेण्यासाठी थांबले होते. (त्या प्रसंगी सत्यता पटेल की) खरोखरी भयंकर तोट्यात आले ते लोक ज्यांनी अल्लाहच्या भेटीला खोटे ठरविले आणि मुळीच ते सरळ मार्गावर नव्हते.''*

*(दिव्य कुरआन, १०:४४-४५)*

(३३) कयामतच्या दिवशी सर्वांना एकत्रित आणले जाईल आणि सर्वांना अल्लाहसमोर हजर केले जाईल.

*''वस्तुस्थिती अशी आहे की यात एक संकेत आहे त्या प्रत्येक माणसासाठी ज्याने परलोकातील यातनांचे भय बाळगले. तो एक दिवस असेल जेव्हा सर्व लोक जमा होतील आणि मग जे काही त्या दिवशी घडेल ते सर्वांच्या डोळ्यांदेखत घडेल.'' (दिव्य कुरआन, ११:१०३)*

(३४) कयामतच्या दिवशी पृथ्वी व आकाश बदलून काहीच्या काही करण्यात येतील आणि सर्वच्या सर्व एकमेव महान अल्लाहसमोर उघडे पडून हजर होतील.

*''सावध करा यांना त्या दिवसापासून जेव्हा पृथ्वी व आकाशाचे मूळ रूप बदलले जाईल, आणि सर्वच्या सर्व एकमेव महान शक्तिमान अल्लाहसमोर उघडे पडून हजर होतील. त्या दिवशी तुम्ही अपराध्यांना पाहाल की साखळदंडाने हातपाय जखडलेले असतील, वितळलेल्या शिशाचा पोषाख केलेला असेल आणि आगीच्या ज्वाला त्यांच्या चेहऱ्यावर आच्छादल्या जात असतील. हे अशासाठी घडेल की अल्लाहने प्रत्येक जीवाला त्याने केलेल्या कृत्यांचा बदला द्यावा. अल्लाहला हिशेब घेण्यास काही वेळ लागत नाही.'' (दिव्य कुरआन, १४:४८-५१)*

**(३५)** कयामतच्या दिवशी अल्लाह सर्वांना एकत्र करील.

*"जीवन आणि मरण आम्ही देतो आणि आम्हीच सर्वांचे वारस होणार आहोत. पूर्वी जे लोक तुमच्यापैकी होऊन गेले आहेत त्यांनाही आम्ही पाहून ठेवले आहे आणि नंतर येणारेदेखील आमच्या नजरेत आहेत. खचितच तुमचा पालनकर्ता त्या सर्वांना एकत्र करील, तो बुद्धिमानही आहे व सर्वज्ञदेखील."* *(दिव्य कुरआन, १५:२३-२५)*

**(३६)** ज्या दिवशी लोक अल्लाहच्या हाकेला ओ देत हजर होतील तेव्हा त्यांना वाटू लागेल की जगात ते थोडा वेळच राहिले होते.

*"काय आश्चर्य की ती घटका जवळच येऊन ठेपली असेल. ज्या दिवशी तो तुम्हाला पुकारील तर तुम्ही त्याची स्तुती करीत त्याच्या हाकेला ओ म्हणून निघून याल आणि तुमची कल्पना त्यावेळी अशी असेल की आम्ही तर केवळ थोड्याच वेळेपर्यंत या स्थितीत पडून राहिलो आहोत."*
*(दिव्य कुरआन, १७:५१-५२)*

**(३७)** मार्गभ्रष्ट झालेले लोक कयामतच्या दिवशी आंधळे, बहिरे व मुके होऊन उठतील.

*"ज्याला अल्लाहने बोधित केले तोच मार्गदर्शन मिळविणारा आहे, आणि ज्याला तो मार्गभ्रष्ट करील त्याच्याशिवाय अशा लोकांसाठी तुला कोणीच समर्थक व सहायक मिळू शकत नाही. या लोकांना आम्ही पुनरुत्थानाच्या दिवशी तोंडघशी फरफटत आणू. आंधळे, मुके आणि बहिरे, यांचे ठिकाण नरक आहे."* *(दिव्य कुरआन, १७:९७)*

**(३८)** कयामतच्या दिवशी पर्वतांना चालविले जाईल, धरणी पूर्णतः उघडी पडेल आणि प्रत्येक माणसाला हाकारून एकत्र केले जाईल.

*" त्या दिवसाची काळजी हवी, जेव्हा आम्ही पर्वतांना चालवू आणि पृथ्वी तुम्हाला पूर्णपणे विवस्त्र दिसेल आणि आम्ही सर्व माणसांना अशा प्रकारे घेरून गोळा करू की (अगोदर व नंतरच्यापैकी) एकदेखील सुटणार नाही."* *(दिव्य कुरआन, १८:४७)*

**(३९)** कयामतच्या दिवशी कर्मनोंद प्रत्येकाच्या पुढ्यात ठेवली जाईल ज्यात माणसाच्या

लहान-मोठ्या सर्व गोष्टींची नोंद असेल.

*"आणि कर्मनोंद पुढे ठेवली जाईल. त्यावेळी तुम्ही पहाल की अपराधी लोक आपल्या जीवन पुस्तकातील नोंदीला भीत असतील आणि म्हणत असतील की, "आमचे दुर्दैव! हे कसले पुस्तक आहे की आमची लहान मोठी कोणतीही कृती अशी उरली नाही जी यामध्ये नोंदली गेली नाही. जे जे काही त्यांनी केले होते ते सर्व त्यांच्या पुढ्यात त्यांना आढळेल आणि तुझा पालनकर्ता कोणावर तिळमात्र अन्याय करणार नाही."*

*(दिव्य कुरआन, १८:४९)*

**(४०)** कयामतच्या दिवशी उद्दाम शिरजोरांना नरकाग्नीपासून वाचण्याचे कोणतेही आश्रयस्थान मिळणार नाही.

*"हे लोक काय करतील त्या दिवशी जेव्हा त्यांचा पालनकर्ता त्यांना म्हणेल की हाक मारा त्या विभूतींना ज्यांना तुम्ही माझे भागीदार समजून बसला होता. हे त्यांचा धावा करतील परंतु ते त्यांच्या मदतीला येणार नाहीत आणि आम्ही त्यांच्या दरम्यान विनाशाचा एकच खड्डा समाईक करून टाकू. सर्व अपराधी त्या दिवशी अग्नी पाहतील आणि समजून घेतील की आता त्यात त्यांचे पतन आहे आणि त्यांना त्यापासून वाचविण्यासाठी कोणतेही आश्रयस्थान मिळणार नाही."*

*(दिव्य कुरआन, १८:५२-५३)*

**(४१)** कयामतच्या दिवशी सर्वजण अवश्य गोळा होतील आणि त्यांच्याबरोबर सैतानसुद्धा घेरून आणला जाईल.

*"काय मनुष्याला आठवत नाही आम्ही पूर्वी त्याला निर्माण केले आहे जेव्हा तो काहीच नव्हता? तुझ्या पालनकर्त्याची शपथ आम्ही अवश्य या सर्वांना आणि यांच्यासमवेत सैतानांना देखील घेरून आणू."*

*(दिव्य कुरआन, १९:६७-६८)*

**(४२)** ईशपरायण लोकांना 'परमदयाळू'च्या हुजुरात अतिथीप्रमाणे सादर केले जाईल, तर गुन्हेगारांना तहानलेल्या जनावरांप्रमाणे नरकाकडे हाकून नेले जाईल.

*"काय तुम्ही पहात नाही की आम्ही सत्याचा इन्कार करणाऱ्यावर सैतान*

*सोडलेले आहेत जे यांना खूप-खूप (सत्याच्या विरोधासाठी) उत्तेजित करीत आहेत? तर आता यांच्यावर प्रकोप कोसळण्यासाठी बेचैन होऊ नका. आम्ही यांचे दिवस मोजीत आहोत. तो दिवस येणार आहे जेव्हा ईशपरायण लोकांना आम्ही अतिथीप्रमाणे 'परमदयाळू'च्या ठायी सादर करू. आणि गुन्हेगारांना आम्ही तृषार्त जनावराप्रमाणे नरकाकडे हाकून नेऊ.''*

*(दिव्य कुरआन, १९:८३-८६)*

**(४३)** कयामतच्या दिवशी नरसिंघ फुंकले जाईल आणि अपराध्यांना हाकारून एकत्र केले जाईल, अशा अवस्थेत की त्यांचे डोळे भयाने थिजून गेलेले असतील.

*''हे पैगंबर (स.)! अशाप्रकारे आम्ही पूर्वी घडलेल्या प्रसंगाच्या वार्ता तुम्हाला ऐकवीत आहोत. आणि आम्ही खास आपल्यापासून तुम्हाला एक उपदेशपाठ (जिक्र) प्रदान केले आहे. जो कोणी यापासून पराङ्मुख होईल तो पुनरुत्थानाच्या दिवशी पापाचे भयंकर ओझे उचलेल, आणि असे सर्व लोक सदैव त्याच्या अरिष्टात गुरफटून राहतील आणि पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांच्यासाठी (या अपराधाच्या जबाबदारीचे ओझे) भयंकर त्रासदायक ओझे असेल. त्या दिवशी जेव्हा शिंग फुंकले जाईल आणि आम्ही अपराध्यांना अशा स्थितीत घेरून आणू की त्यांचे डोळे (भीतीमुळे) थिजलेले असतील, आपापसांत हळूहळू म्हणतील की, ''जगात तुम्ही मुश्किलीने काही दहाच दिवस घालविले असतील.'' आम्हाला चांगलेच माहीत आहे की ते काय बोलत असतील. (आम्हाला हेदेखील माहीत आहे की) त्यावेळी त्यांच्यापैकी जो जास्तीत जास्त जपून अंदाज लावणारा असेल तो म्हणेल की नव्हे, तुमचे जगातील जीवन केवळ एका दिवसाचे होते. हे लोक तुम्हाला विचारतात की बरे, त्या दिवशी हे पर्वत जातील तरी कुठे? सांगा की माझा पालनकर्ता त्यांना धूळ बनवून उडवून देईल. आणि पृथ्वीला असे सपाट सुरळीत मैदान बनवून टाकील, की त्यात तुम्हाला एखादासुद्धा वळसा आणि सुरकुती दिसणार नाही. त्या दिवशी सर्व लोक हाक देणाऱ्याच्या हाकेवर सरळ चालत येतील, कोणी थोडासुद्धा ताठपणा दाखवू शकणार नाही आणि आवाज कृपावंताच्या पुढे दबून जातील, एका चाहूलीव्यतिरिक्त तुम्हाला काहीही ऐकू येणार नाही. त्या*

*दिवशी शिफारस उपयुक्त ठरणार नाही याशिवाय की एखाद्याला कृपावंत तशी परवानगी देईल आणि त्यांचे म्हणणे ऐकून घेणे पसंत करील, तो लोकांची मागील पुढील सर्व स्थिती जाणतो आणि दुसऱ्यांना त्याचे पूर्ण ज्ञान नाही. लोकांची मस्तके त्या चिरंजीव व चिरस्थायीच्यासमोर नम्र होतील. निष्फळ ठरेल तो, ज्याने त्यावेळी एखाद्या अत्याचाराचे पापओझे उचललेले असेल, आणि कसलाही अत्याचार अथवा हक्क मारला जाण्याची भीती नसेल त्या व्यक्तीला जी सत्कृत्ये करील आणि याचबरोबर ती ईमानधारकसुद्धा असेल.''* (दिव्य कुरआन, २०:१९-११२)

**(४४)** कयामत अकस्मात येईल व त्यांच्यावर अशा प्रकारे एकदम झडप घालील की ते तिला परतवूही शकणार नाहीत आणि त्यांना क्षणाचीही सवड मिळणार नाही.

*''हे लोक म्हणतात, 'अखेर ही धमकी पूर्ण कधी होणार, जर तुम्ही खरे असाल?' या ईशद्रोह्यांना त्या वेळेचे काही ज्ञान असते जेव्हा हे आपले तोंडही आगीपासून वाचवू शकणार नाहीत न आपल्या पाठी आणि यांना कोठून मदतही पोहचणार नाही. ती आपत्ती अकस्मात येईल आणि त्यांच्यावर अशाप्रकारे एकदम झडप घालील की हे तिला परतवूही शकणार नाहीत की यांना क्षणभर सवलतही मिळणार नाही. उपहास तुमच्या पूर्वीच्या पैगंबरंचादेखील केला गेला आहे परंतु त्यांचा उपहास करणारे त्याच गोष्टीच्या फेऱ्यात आले ज्याचा उपहास ते करीत असत.''*

(दिव्य कुरआन २१: ३८-४१)

**(४५)** ज्या क्षणी नरसिंघ फुंकले जाईल तेव्हा त्यांच्यात कसलेही नाते-गोते उरणार नाही आणि ते एकमेकांची विचारपूसही करणार नाहीत.

*''मग ज्या क्षणी शिंग फुंकले जाईल त्यांच्यात मग कोणतेही नाते उरणार नाही आणि ते एकमेकाला विचारणारदेखील नाहीत. त्यावेळेस ज्यांचे पारडे जड असेल तेच यश संपादन करतील आणि ज्यांचे पारडे हलके असेल तेच लोक असतील ज्यांनी आपल्या स्वत:ला तोट्यात घातले, ते नरकात सदैव राहतील. अग्नी त्यांच्या मुखाचे चामडे भक्ष करून टाकील आणि त्यांचे जबडे बाहेर निघतील.''*

(दिव्य कुरआन, २३:१०१-१०४)

**(४६)** जेव्हा नरसिंघ फुंकले जाईल तेव्हा सर्वजण धास्तावतील व ते निष्ठूरपणे अल्लाहच्या हुजुरात हजर होतील.

*"आणि काय घडेल त्या दिवशी जेव्हा शिंग फुंकले जाईल आणि धसका घेतील ते सर्व जे आकाशांत आणि पृथ्वीत आहेत, त्या लोकांखेरीज ज्यांना अल्लाह त्या धास्तीपासून वाचवू इच्छिल आणि सर्व निमूटपणे त्याच्या हुजुरात हजर होतील. आज तू पर्वतांना पाहतोस आणि समजतोस की खूप दृढ आहेत पण त्यावेळी हे ढगांप्रमाणे उडत असतील, हा अल्लाहच्या सामर्थ्याचा चमत्कार असेल, ज्याने प्रत्येक वस्तूला परिपूर्ण घडविले आहे. तो भल्याप्रकारे जाणतो की तुम्ही लोक काय करता, जो मनुष्य भलेपणा घेऊन येईल त्याला त्याच्यापेक्षा अधिक चांगला मोबदला मिळेल आणि असले लोक त्या दिवसाच्या धास्तीपासून सुरक्षित राहतील, आणि जो वाईटपणा घेऊन येईल असले सर्व लोक पालथ्या तोंडी अग्नीत फेकले जातील. काय तुम्ही याव्यतिरिक्त अन्य एखादा मोबदला प्राप्त करू शकता की, जसे तुम्ही कराल तसेच तुम्हाला लाभेल."*

*(दिव्य कुरआन, २७:८७-९०)*

**(४७)** कयामतच्या दिवशी जेव्हा तुम्हाला पुकारले जाईल जेव्हा एक हाकेतच तुम्ही सर्वजण ताबडतोब निघून याल.

*"आणि त्याच्या संकेतांपैकी हे आहे की आकाश व पृथ्वी त्याच्या आज्ञेने स्थायी आहेत. मग ज्याक्षणी तो तुम्हाला भूमीतून पुकारील केवळ एकाच हांकेत अकस्मात तुम्ही निघून याल. आकाशांत आणि पृथ्वीत जे जे आहेत त्याचे दास आहेत. सर्वच्या सर्व त्याच्या आज्ञाधीन आहेत. तोच आहे जो सृष्टीचा प्रारंभ करतो, मग तोच तिची पुनरावृत्ती करील आणि हे त्याच्यासाठी अधिक सुलभ आहे. आकाश आणि पृथ्वीत त्याचे गुणवैशिष्ठ्य सर्वात वरचढ आहे, आणि तो जबरदस्त आणि बुद्धिमान आहे."* *(दिव्य कुरआन, ३०:२५-२७)*

**(४८)** जेव्हा प्रलयाचा विस्फोट होईल आणि तो विस्फोट ऐकला जाईल तेव्हा तुम्ही काही बोलूही शकणार नाही आणि निसटून कुठे जाऊही शकणार नाही.

*"हे लोक म्हणतात की, 'ही पुनरुत्थानाची धमकी पूरी तरी केव्हा होणार?*

*पदार्थ आणि अत्यंत वाईट विश्रांतीस्थान!"(दिव्य कुरआन, १८:२९)*

**(१९०)** नरकामध्ये मनुष्य जिवंतही राहणार नाही व मरणारही नाही.

*"वस्तुस्थिती अशी आहे की जो अपराधी बनून आपल्या पालनकर्त्याच्या ठायी हजर होईल त्याच्यासाठी नरक आहे की जिच्यात तो जिवंतही राहणार नाही व मरणारही नाही. आणि जो त्याच्या ठायी ईमानधारक म्हणून हजर होईल, ज्याने सत्कृत्ये केली असतील अशा सर्व लोकांसाठी उच्च दर्जे आहेत, सदाबहार उद्याने आहेत ज्यांच्या खालून कालवे वहात असतील, त्यांच्यात ते सदैव राहतील, हा मोबदला आहे त्या व्यक्तीसाठी ज्याने पावित्र्य स्वीकारले." (दिव्य कुरआन, २०:७४-७६)*

**(१९१)** अग्नीचा पोशाख असेल, डोक्यावर उकळते पाणी ओतले जाईल व त्यांचा समाचार घेण्यासाठी लोखंडी गदा असतील.

*"हे दोन पक्ष आहेत ज्यांच्या दरम्यान आपल्या पालनकर्त्यासंबंधी वितंडवाद२ आहे, यांच्यापैकी ते लोक ज्यांनी सत्य नाकारले, त्यांच्यासाठी अग्नीचा पोषाख तयार केला गेला आहे. त्यांच्या डोक्यावर उकळते पाणी टाकले जाईल ज्यामुळे त्यांची केवळ त्वचाच नव्हे तर पोटाच्या आतील भागदेखील वितळेल आणि त्यांचा समाचार घेण्यासाठी लोखंडी घण असतील. जेव्हा जेव्हा ते घाबरून नरकामधून बाहेर पडण्याचा प्रयत्न करतील परत त्यातच ढकलून दिले जातील की चाखा आता जळण्याच्या शिक्षेची चव." (दिव्य कुरआन, २२:१९-२२)*

**(१९२)** अग्नी त्यांच्या मुखाची चामडीही भक्ष करील, त्यांचे जबडे बाहेर येतील.

*"त्या दिवशी ज्यांचे पारडे जड असेल तेच यश संपादन करतील आणि ज्यांचे पारडे हलके असेल तेच लोक असतील ज्यांनी आपल्या स्वत:ला तोट्यात घातले, ते नरकात सदैव राहतील. अग्नी त्यांच्या मुखाचे चामडे भक्ष करून टाकील आणि त्यांचे जबडे बाहेर निघतील."*

*(दिव्य कुरआन, २३:१०२-१०४)*

**(१९३)** दुरूनच नरकाच्या क्रोधाचे व जोशाचे आवाज ऐकू येतील. लोक आपल्या मृत्युला पुकारतील.

*"मुळात गोष्ट अशी आहे की या लोकांनी त्या घटकेला खोटे मानले आहे. आणि जो त्या घटकेला खोटे ठरवील त्याच्यासाठी आम्ही भडकलेली आग उपलब्ध करून ठेवली आहे. ती जेव्हा दुरून यांना पाहील तेव्हा हे तिच्या क्रोधाचे व आवेशाचे आवाज ऐकून घेतील. आणि जेव्हा हे हाता-पायांनी बंदिस्त तिच्यात एका अरुंद जागेत घुसडले जातील तेव्हा आपल्या मृत्यूला पुकारू लागतील. (तेव्हा त्यांना सांगितले जाईल) आज एका मृत्यूला नव्हे तर अनेक मृत्यूंना पुकारा."*

*(दिव्य कुरआन, २५:११-१४)*

**(१९४)** नरकाच्या यातना जीवघेण्या आहेत व ते अत्यंत वाईट ठिकाण आहे.

*"कृपावंताचे (अस्सल) दास ते आहेत जे जमिनीवर नम्रपणे चालतात आणि अडाणी त्यांच्या तोंडी लागले तर म्हणतात की तुम्हाला सलाम. ते आपल्या पालनकर्त्याच्या ठायी नतमस्तक होण्यात अहोरात्र उभे राहतात. जे प्रार्थना करीत असतात की, "हे आमच्या पालनकर्त्या, नरकाच्या यातनांपासून आम्हाला वाचव, त्याच्या यातना तर जीवघेण्या आहेत, ते तर फारच वाईट निवास व ठिकाण आहे."*

*(दिव्य कुरआन, २५:६३-६६)*

**(१९५)** जेव्हा कोणी तेथून बाहेर येऊ पाहील त्याला पुन्हा त्यातच लोटले जाईल.

*"आणि ज्यांनी मर्यादांचे उल्लंघन अंगिकारले आहे, त्यांचे ठिकाण नरक आहे, जेव्हा कधी ते त्यातून बाहेर पडू इच्छितील तिच्यातच ढकलून दिले जातील आणि त्यांना सांगितले जाईल की घ्या, आता त्याच अग्नी-प्रकोपाचा आस्वाद ज्याला तुम्ही खोटे ठरवीत होता."*

*(दिव्य कुरआन, ३२:२०)*

**(१९६)** त्यांच्या गळ्यात जोखड अडकलेले असेल.

*"सरतेशेवटी जेव्हा हे लोक प्रकोप पाहतील तेव्हा आपल्या मनात पश्चात्ताप करतील, आणि आम्ही या इन्कार करणाऱ्यांच्या गळ्यात जोखड घालू - काय लोकांना याखेरीज इतर कोणता बदला दिला जावू शकतो की जशी कृत्ये त्यांची होती तसा मोबदला त्यांना मिळेल?*

*(दिव्य कुरआन, ३४:३३)*

**(१९७)** त्यांच्या यातनाही कमी होणार नाहीत व मृत्युही येणार नाही.

*"आणि ज्या लोकांनी द्रोह केला त्यांच्याकरिता नरकाचा अग्नी आहे. त्यांना निकालातही काढले जाणार नाही आणि त्यांच्या नरकाच्या शिक्षेतदेखील कोणती कपात केली जाणार नाही. अशाप्रकारे आम्ही मोबदला देत असतो प्रत्येक इसमाला जो सत्याचा इन्कार करणारा आहे. ते तेथे एकदाच ओरडून म्हणतील, "हे आमच्या पालनकर्त्या! येथून आम्हाला बाहेर काढ जेणेकरून आम्ही सत्कृत्ये करू. त्या कृत्यापासून भिन्न जे पूर्वी करीत होतो." (त्यांना उत्तर दिले जाईल) "काय आम्ही तुम्हाला इतके आयुष्य दिले नव्हते ज्यात एखाद्याला बोध घ्यायचा असता तर त्याने घेतला असता? आणि तुमच्यापाशी सावध करणारादेखील आला होता. आता चव चाखा, अत्याचाऱ्यांचा येथे कोणीही सहायक नाही."* *(दिव्य कुरआन, ३५:३६-३७)*

**(१९८)** जुक्कूम (निवडुंग) च्या झाडाचे जेवण आणि वर पिण्यासाठी उकळते पाणी मिळेल.

*"सांगा, हा पाहुणचार चांगला आहे की 'जक्कूम'चे झाड? आम्ही त्या झाडाला अत्याचारी लोकांसाठी उपद्रव बनविलेले आहे. ते एक झाड आहे जे नरकाच्या तळातून निघते. (त्याच्या कळ्या अशा आहेत जणूकाही शैतानाची डोकी. नरकाचे लोक ते खातील आणि त्यानेच पोट भरतील, मग त्यावर त्यांना पिण्यासाठी उकळते पाणी मिळेल. आणि त्यानंतर त्यांची रवानगी त्याच नरकाग्नीकडे होईल. हे ते लोक होत ज्यांना आपले पूर्वज मार्गभ्रष्ट आढळले, आणि त्यांच्याच पदचिन्हांवर धावले."*

*(दिव्य कुरआन, ३७:६२-७०)*

**(१९९)** नरक अत्यंत वाईट निवासस्थान आहे तेथे पिण्यासाठी उकळते पाणी आणि पू व रक्त दिले जाईल.

*"आणि दुराचाऱ्यांसाठी अत्यंत वाईट ठिकाण आहे, नरक ज्यात ते होरपळले जातील, फारच वाईट ठिकाण. हे आहे त्यांच्यासाठी, बस्स त्यांनी चव घ्यावी उकळते पाणी आणि पू, रक्त व अशाच प्रकारच्या कटुतेची."* *(दिव्य कुरआन, ३८:५५-५८)*

**(२००)** त्यांच्यावर अग्नीचे छत वरूनही आच्छादलेले असेल व खालूनसुद्धा.

*"सांगा, खरे दिवाळखोर तर तेच होत ज्यांनी पुनरुत्थानाच्या दिवशी स्वत:ला व आपल्या कुटुंबियांना नुकसानीत टाकले. चांगले ऐकून घ्या, हीच उघड दिवाळखोरी होय. त्यांच्यावर वरून खालून अग्नीछत आच्छादलेले असेल. हा तो शेवट आहे ज्याची अल्लाह आपल्या दासांना भीती दाखवितो, म्हणून हे माझ्या दासांनो, माझ्या कोपापासून दूर रहा."*

*(दिव्य कुरआन, ३९:१५-१६)*

**(२०१)** मानेत जोखड असेल, साखळदंडांनी ते बंदिस्तावस्थेत उकळत्या पाण्याकडे व अग्नीकडे फरफटत नेले जातील.

*"तुम्ही पाहिले काय त्या लोकांना जे अल्लाहच्या वचनांमध्ये वाद घालतात, कोठून ते फिरविले जात आहेत? हे लोक जे या ग्रंथास आणि त्या सर्व ग्रंथांस खोटे लेखत आहेत, जे आम्ही आमच्या पैगंबरंबरोबर पाठविले होते, लवकरच यांना कळून येईल, जेव्हा जोखड यांच्या मानेत असतील आणि साखळ्या, ज्यांनी पकडून ते उकळत्या पाण्याकडे फरफटले जातील आणि नंतर नरकाग्नीत लोटले जातील."*

*(दिव्य कुरआन, ४०:६९-७२)*

**(२०२)** जक्कुमचे झाड गुन्हेगारांचे खाद्यान्न असेल.

*"जक्कूमचे वृक्ष गुन्हेगारांचे खाद्य असेल, तेलाच्या उकळीप्रमाणे, पोटांत ते अशाप्रकारे उकळेल जसे उकळते पाणी उसळत असते, "धरा याला आणि फरफटत न्या याला नरकाच्या मधोमध. आणि ओता याच्या डोक्यावर उकळत्या पाण्याचा प्रकोप. चाख याची चव, मोठा जबरदस्त सन्माननीय मनुष्य आहेस तू. ही तीच गोष्ट आहे जिच्या येण्यात तुम्ही लोक शंका बाळगत होता."* *(दिव्य कुरआन, ४४:४३-५०)*

**(२०३)** आतडे कापून काढणारे गरम पाणी पाजले जाईल.

*"(काय तो मनुष्य ज्याच्या वाट्याला हा स्वर्ग येणार आहे) त्या लोकांसमान होऊ शकतो जे नरकामध्ये सदैव राहतील आणि ज्यांना असले गरम पाणी पाजले जाईल जे त्यांचे आंतडेसुद्धा कापून टाकील? यांच्यापैकी*

*काही लोक असे आहेत जे कान लावून तुमचे म्हणणे ऐकतात आणि मग जेव्हा तुमच्या जवळून निघतात तेव्हा त्या लोकांना ज्यांना ज्ञानाची देणगी प्रदान केली गेली आहे, विचारतात की आता इतक्यात यांनी काय सांगितले होते? हे ते लोक आहेत ज्यांच्या हृदयावर अल्लाहने मोहर लावून टाकली आहे आणि हे आपल्या वासनांचे अनुयायी बनले आहेत.'' (दिव्य कुरआन, ४७:१५-१६)*

**(२०४)** ते लोक जक्कुमच्या झाडांचे अन्न खातील, त्यानेच पोट भरतील, त्यावर उकळते पाणी पाणढोसळणी लागलेल्या उंटासारखे पितील.

*''हे पैगंबर (स.), या लोकांना सांगा, निःसंशय पूर्वीचे व नंतरचे सर्व एके दिवशी अवश्य जमा केले जाणार आहेत, ज्याची वेळ निश्चित करण्यात आली आहे. मग हे पथभ्रष्टांनो, आणि खोटे ठरविणाऱ्यांनो, तुम्ही जक्कूम (निवडुंग) च्या झाडाचे खाद्य खाणार आहात, त्यानेच तुम्ही पोट भराल आणि त्यावर उकळते पाणी, पाणढोसळणी लागलेल्या उंटाप्रमाणे प्याल. असा आहे (या डाव्या बाजूवाल्यांच्या) मेजवानीचा सरंजाम मोबदल्याच्या दिवशी.'' (दिव्य कुरआन, ५६:४९-५६)*

**(२०५)** नरकाची देखरेख करण्यासाठी नियुक्त केलेले दूत अत्यंत तापट व कठोर आहेत.

*''हे लोकहो! ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, वाचवा स्वतःला आणि आपल्या कुटुंबियांना त्या अग्नीपासून जिचे इंधन मनुष्य आणि दगड असतील, त्यावर अत्यंत तापट व कठोर स्वभावी दूत नेमलेले असतील जे कधीही अल्लाहच्या आज्ञेचा भंग करीत नाहीत आणि जी काही आज्ञा त्यांना दिली जाते तिची ते अंमलबजावणी करतात. (त्यावेळी सांगितले जाईल की) हे अश्रद्धावंतांनो, आज निमित्ते पुढे करू नका. तुम्हाला तर तसाच बदला दिला जात आहे जसे तुम्ही आचरण करीत होता.''*

*(दिव्य कुरआन, ६६:६-७)*

**(२०६)** नरकवासी लोक तिच्या गर्जनेचा भयंकर आवाज ऐकतील.

*''ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याशी द्रोह केला आहे त्यांच्यासाठी नरकाचा प्रकोप आहे आणि ते फारच वाईट ठिकाण आहे. जेव्हा ते त्यात*

*फेकले जातील तेव्हा ते त्याच्या गर्जनेचा भयंकर आवाज ऐकतील, आणि तो उसळी घेत असेल, क्रोधाच्या तीव्रतेने तो बेभान होत असेल. प्रत्येक वेळी जेव्हा त्याच्यात एखादी झुंड फेकली जाईल.''*

*(दिव्य कुरआन, ६७:६-८)*

**(२०७)** नरकवासीयांसाठी मानेत जोखड आणि सत्तर हात लांबीचे साखळदंड असतील आणि पोट भरण्यासाठी जखमांच्या धुवणी असतील.

*''(आज्ञा होईल) धरा याला आणि याच्या मानेत जोखड घाला, मग याला नरकामध्ये झोकून द्या, मग याला सत्तर हात लांब साखळीत जखडा. हा श्रेष्ठ व उच्चतर अल्लाहवर श्रद्धाही ठेवीत नव्हता व गरिबांना जेवण देण्यास लोकांना उद्युक्तही करीत नव्हता. म्हणून आज येथे याचा ना कोणी दुःखाचा वाटेकरी मित्र आहे आणि ना जखमांच्या पू शिवाय त्याच्यासाठी कोणते जेवण, ज्यास अपराध्याशिवाय कोणीही खात नाही.''* *(दिव्य कुरआन, ६९:३०-३७)*

**(२०८)** भडकत्या अग्नीच्या ज्वाला असतील आणि त्या मांस व चामडी चाटून काढतील.

*''कदापि नाही, ती तर भडकत्या अग्नीची ज्वाला असेल जी मांस व कातडीला चाटून टाकील. हांका मारूनमारून आपल्याकडे बोलाविल त्या प्रत्येक माणसाला जो सत्यापासून विमुख झाला आणि ज्याने पाठ फिरविली, आणि संपत्ती संचित केली आणि जपूनजपून ठेवली.''*

*(दिव्य कुरआन, ७०:१५-१८)*

**(२०९)** नरकवासीयांसाठी भारी बेड्या, भडकत असलेला अग्नी, घशात अडकणारे जेवण व यातनादायक प्रकोप असेल.

*''या खोटे ठरविणाऱ्या सुखवस्तू लोकांशी निपटण्याचे कार्य तुम्ही माझ्यावर सोडा, आणि त्यांना काही थोडा वेळ याच अवस्थेत राहू द्या. आमच्याजवळ (यांच्यासाठी) भारी बेड्या आहेत आणि भडकत असलेला अग्नी, आणि घशात अडकणारे जेवण व यातनामय प्रकोप. हे त्या दिवशी घडेल जेव्हा पृथ्वी आणि पर्वत हादरून उठतील आणि पर्वतांची स्थिती अशी होईल जणू वाळूचे ढिगारे विखुरले जात आहेत.''*

*(दिव्य कुरआन, ७३:११-१४)*

(२१०) चामडी भाजून काढणाऱ्या नरकाची व्यवस्था पाहाण्यासाठी एकोणीस कर्मचारी नियुक्त आहेत.

*"आणि तुम्हाला काय कल्पना की काय आहे तो नरक? ना बाकी ठेवणार ना सोडणार. कातडी होरपळून टाकणारा. एकोणीस कर्मचारी त्याच्यावर नियुक्त आहेत." (दिव्य कुरआन, ७४:२७-३०)*

(२११) सत्याचा इन्कार करणाऱ्यांसाठी साखळदंड, जोखड व भडकणारा अग्नी तयार ठेवलेला आहे.

*"काय मानवावर अनंत काळाची एक वेळ अशीही येऊन गेली आहे जेव्हा तो काही उल्लेखनीय वस्तू नव्हता? आम्ही मानवाला एका मिश्र वीर्यापासून निर्माण केले, जेणेकरून त्याची परीक्षा घ्यावी आणि यासाठी आम्ही त्याला ऐकणारा व पाहणारा बनविला. आम्ही त्याला मार्ग दाखविला, मग त्याने कृतज्ञ बनावे अथवा द्रोह करणारा. द्रोह करणाऱ्यांसाठी आम्ही साखळदंड आणि जोखड व भडकणारा अग्नी तयार ठेवला आहे."*

*(दिव्य कुरआन, ७६:१-४)*

(२१२) जहन्नम (नरक) शिरजोर लोकांसाठी एक सापळा आहे. तेथे त्यांच्यासाठी उकळते पाणी व जखमांची धुवण असेल.

*"वस्तुतः नरक एक सापळा आहे, दुराचाऱ्यांचे ठिकाण, ज्यात ते युगानुयुगे पडून राहतील. त्यात गारवा आणि पिण्यालायक कोणत्याही पदार्थाचा आस्वाद ते घेणार नाहीत. काही मिळेल तर केवळ गरम पाणी आणि जखमांचा पू (त्यांच्या कृत्यांचा), भरपूर बदला. ते कोणत्याही हिशोबाची अपेक्षा बाळगीत नव्हते आणि आमच्या संकेतवचनांना त्यांनी पूर्णतः खोटे ठरविले होते. आणि स्थिती अशी होती की आम्ही प्रत्येक गोष्ट गणना करून नोंदवून ठेवली होती. आता चाखा चव, आम्ही तुमच्यासाठी प्रकोपाशिवाय कोणत्याही गोष्टीत कदापि वाढ करणार नाही."*

*(दिव्य कुरआन, ७८:२१-३०)*

(२१३) नरकवासी लोक तीव्र आगीत भाजून निघतील. उकळत्या झऱ्याचे पाणी व काटेरी वाळलेल्या गवताशिवाय अन्य कसलेही भोजन त्यांच्यासाठी असणार नाही.

*“काय तुम्हाला त्या व्यापून टाकणाऱ्या आपत्ती (म्हणजे पुनरुत्थानाची) खबर पोहचली आहे? काही चेहरे त्या दिवशी भयभीत असतील, कठोर परिश्रम करीत असतील. थकून जात असतील. तीव्र आगीत होरपळून निघत असतील. उकळत्या झऱ्याचे पाणी त्यांना पिण्यास दिले जाईल. काटेरी वाळलेल्या गवताशिवाय कोणतेही भोजन त्यांच्यासाठी असणार नाही जे ना पुष्ट करील, जे ना भूक शमवील.”*

*(दिव्य कुरआन, ८८:१-७)*

# जन्नत (स्वर्ग)

(२१४) जन्नतमध्ये अशा बागा असतील ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील, जेथे फळफळावळ आणि निर्मळ पत्नी असतील.

*"आणि हे पैगंबर (स.), जे या ग्रंथावर इमान धारण करतील व (यानुसार) सद्‌वर्तन करतील त्यांना खुशखबर द्या की त्यांच्यासाठी अशी नंदनवने असतील ज्यांच्या खालून झरे वाहत असतील. या बागांतील फळे दिसण्यात जगातील फळांसारखीच असतील. जेव्हा त्यांना एखादे फळ दिले जाईल तेव्हा ते म्हणतील की अशीच फळे यापूर्वी जगात आम्हाला दिली जात असत त्यांच्यासाठी तिथे पवित्र व चारित्र्यवान जोडपे असतील. आणि ते सदैव तिथेच राहतील."* *(दिव्य कुरआन, २:२५)*

(२१५) स्वर्ग निवासीयांची अंत:करणे परस्परांविषयीच्या मलीनतेपासून शुद्ध असतील.

*"हे स्वर्गात वास करणारे आहेत जेथे ते सदैव राहतील. त्यांच्या मनात एक दुसऱ्याच्याविरूद्ध जी मलीनता असेल ती आम्ही दूर करू. त्यांच्या खालून कालवे वाहत असतील आणि ते सांगतील, "स्तुती फक्त अल्लाहकरिताच आहे ज्याने आम्हाला हा मार्ग दाखविला. आम्ही स्वत: मार्ग प्राप्त करू शकलो नसतो जर अल्लाहने आमचे मार्गदर्शन केले नसते. आमच्या पालनकर्त्याने पाठविलेले पैगंबर खरोखर सत्यच घेऊन आले होते." त्यावेळेस वाणी ऐकू येईल, "हा स्वर्ग ज्याचे तुम्ही वारस बनविले गेले आहात तो तुम्हाला त्या कृत्यांच्या मोबदल्यात मिळाला आहे, जी तुम्ही करीत राहिला होता."*

*(दिव्य कुरआन, ७:४२-४३)*

(२१६) स्वर्गामध्ये अल्लाहची कृपा, प्रसन्नता आणि चिरंतन ऐश्वर्याचा सरंजाम असेल.

*"अल्लाहच्या येथे तर त्याच लोकांचा दर्जा मोठा आहे ज्यांनी श्रद्धा ठेवली व ज्यांनी अल्लाहच्या मार्गात घरेदारे सोडली आणि जीवित व वित्तानिशी संघर्ष (जिहाद) केले, तेच यशस्वी आहेत. त्यांचा पालनकर्ता त्यांना आपली कृपा व प्रसन्नता आणि अशा स्वर्गाची शुभवार्ता देतो जेथे त्यांच्यासाठी चिरस्थायी ऐश्वर्याचा सरंजाम आहे. त्यांच्यात ते सदैव*

*राहतील. निश्चितपणे अल्लाहजवळ सेवेचे फळ देण्यासाठी बरेच काही आहे.'' (दिव्य कुरआन, ९:२०-२२)*

(२१७) ऐश्वर्यसंपन्न स्वर्गामध्ये खालून कालवे वाहात असतील. स्वर्गनिवासी लोक अल्लाहच्या पावित्र्याचा सतत उद्‌घोष करीत राहतील आणि एकमेकांची शांती आणि सुरक्षितता चिंतीत असतील व ईशगुणगान करीत असतील.

*''आणि ही देखील वस्तुस्थिती आहे की ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली (म्हणजे ज्यांनी हे सत्य मान्य केले जे या ग्रंथात सांगितले आहे) आणि सत्कृत्ये करीत राहिले त्यांना त्यांचा पालनकर्ता त्यांच्या श्रद्धेमुळे सरळमार्गी बनवील, ऐश्वर्यसंपन्न स्वर्गांमध्ये, त्यांच्या खालून कालवे वाहतील, तेथे त्यांची उद्‌घोषणा अशी असेल की, ''पवित्र आहेस तू हे अल्लाह!'' त्यांची प्रार्थना अशी असेल, ''शांती व सुरक्षितता असो'' आणि त्यांच्या प्रत्येक गोष्टीचा शेवट असा असेल, ''सर्व स्तुती सर्व जगांच्या पालनकर्त्या अल्लाहसाठीच आहे.'' (दिव्य कुरआन, १०:९-१०)*

(२१८) स्वर्ग हे सदैव निवासाचे स्थान असेल.

*''नि:संशय तुझा पालनकर्ता पूर्ण अधिकार राखतो की जी इच्छा असेल ते करतो. उरले ते लोक जे भाग्यवान ठरतील ते स्वर्गामध्ये जातील आणि तेथे सदैव राहतील जोपर्यंत आकाश व पृथ्वी टिकून आहेत, याखेरीज की तुझ्या पालनकर्त्याने काही अन्य इच्छा करावी. असले बक्षीस त्यांना मिळेल ज्याचा क्रम कधीही खंडित होणार नाही.''*

*(दिव्य कुरआन, ११:१०७-१०८)*

(२१९) स्वर्ग हे चिरकालीन उत्तम निवासस्थान आहे. जेथे माणूस आपल्या सदाचारी आप्तेष्टांसह राहील.

*''त्यांची अवस्था अशी असते की आपल्या पालनकर्त्याच्या प्रसन्नतेकरिता संयमाने वागतात, नमाज कायम करतात, आमच्या दिलेल्या उपजीविकेतून उघड व गुप्तपणे खर्च करतात आणि वाईटाला भलाईने नाहीसे करतात, परलोकाचे घर त्याच लोकांसाठी आहे. अर्थात अशी उद्याने जी त्यांची चिरकालीन निवासस्थाने असतील, ते स्वत:देखील त्यांच्यात प्रवेश*

*करतील व त्यांचे वाडवडील व त्यांच्या पत्नीं आणि त्यांच्या संततीपैकी जे जे सदाचारी आहेत तेदेखील त्यांच्या समवेत तेथे जातील. दूत चोहोंबाजूनी त्यांच्या स्वागताकरिता येतील.'' (दिव्य कुरआन, १३:२२-२३)*

(२२०) त्या अशा बागा आहेत ज्यांच्या खालून कालवे वाहातात. त्यातील फळे अनश्वर तर तेथील सावली चिरंतन आहे.

*''ईशपरायण माणसांसाठी ज्या जन्नतचे वचन दिले गेले आहे त्याचे वैभव असे आहे की त्याच्या खालून कालवे वाहत आहेत, त्याची फळे चिरंतन आहेत, आणि त्याची सावली अनश्वर. हा शेवट आहे पापभीरु लोकांचा आणि सत्याचा इन्कार करणाऱ्यांचा शेवट असा आहे की त्याच्याकरिता नरकाग्नी आहे.'' (दिव्य कुरआन, १३:३५)*

(२२१) ईशपरायण लोक अशा स्वर्गामध्ये राहातील जेथे बागा असतील, झरे असतील. ते पूर्णतः शांतीचे घर असेल. तेथील निवासी बंधुभावाने व निष्कपटपणे राहातील.

*''याउलट ईशपरायण लोक बागेत आणि झऱ्यांच्यामध्ये राहतील. आणि त्यांना सांगितले जाईल की प्रवेश करा यात सुखरूपपणे आणि निर्भयपणे व बिनधोकपणे. त्यांच्या हृदयात जी काही थोडी फार खोट-कपट असेल ती आम्ही काढून टाकू, ते आपापसांत भाऊ-भाऊ बनून समोरासमोर तख्तांवर बसतील. त्यांना तेथे कोणत्याही कष्टाला सामोरे जावे लागणार नाही आणि ते तेथून निष्काशीत केले जाणार नाहीत.''*

*(दिव्य कुरआन, १५:४५-४८)*

(२२२) स्वर्गनिवासी लोक जे इच्छितील ते त्यांना मिळेल. चिरंतन निवासाचे ते स्थान आहे.

*''अशा प्रकारच्या पुण्यकर्मी लोकांसाठी या जगातही कल्याण आहे आणि परलोकातील घर तर हमखास त्यांच्यासाठी उत्तम आहे. फारच चांगले घर आहे. ईशपरायण लोकांचे. चिरंतन निवासाचे स्वर्ग ज्याच्यात ते दाखल होतील, खालून कालवे वाहात असतील आणि सर्व काही तेथे अगदी इच्छेप्रमाणे असेल. असा मोबदला देतो अल्लाह ईशपरायण*

*लोकांना.''* *(दिव्य कुरआन, १६:३०-३१)*

(२२३) हे सुवर्णकंकणे, तलम रेशीम व भरजरी सॅटीनची हिरवी वस्त्रे परिधान करतील.

*''उरले ते लोक जे ईमानधारक असतील आणि सत्कृत्ये करतील, तर निश्चितच आम्ही सत्कृत्ये करणाऱ्या लोकांचा मोबदला वाया घालवीत नसतो. त्यांच्यासाठी सदाबहार स्वर्ग आहेत ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील, तेथे ते सुवर्ण कंकणांनी विभूषित केले जातील तलम रेशम आणि भरजरी हिरवी वस्त्रे ते परिधान करतील आणि उच्चासनावर लोड लाऊन बसतील. उत्तम मोबदला आणि उत्कृष्ट दर्जाचे निवासस्थान!''*
*(दिव्य कुरआन, १८:३०-३१)*

(२२४) सदैव राहणाऱ्या बागा ज्यातून निघून जाण्यास मन तयार होणार नाही.

*''तथापि ते लोक ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली त्यांच्या पाहुणचारासाठी फिरदौसच्या (स्वर्गाच्या) बागा असतील, ज्यांत ते सदैव राहतील आणि कधीही इतरत्र जाण्याची त्यांची इच्छा होणार नाही.''*
*(दिव्य कुरआन, १८:१०७-१०८)*

(२२५) तेथे कोणतीही वाह्यात गोष्ट त्यांना ऐकावी लागणार नाही आणि सकाळ संध्याकाळ त्यांना उपजीविका मिळत राहील.

*''तथापि ज्यांनी पश्चात्ताप केला आणि श्रद्धा ठेवली आणि सदाचरण अवलंबिले ते स्वर्गामध्ये दाखल होतील. आणि त्यांचे तिळमात्रदेखील हक्क मारले जाणार नाहीत. त्यांच्यासाठी सदैव राहणारे स्वर्ग आहेत ज्यांचे परमदयाळूने आपल्या दासांना आडपडद्यात वचन दिले आहे आणि खचितच ते वचन पूर्ण होऊनच राहणार आहे. तेथे ते कोणतीही वाह्यात गोष्ट ऐकणार नाहीत. जे काही ऐकतील योग्यच ऐकतील आणि त्यांची उपजीविका त्यांना सतत सकाळ-संध्याकाळ मिळत राहील. हाच आहे तो स्वर्ग ज्याचा वारस आमच्या दासांपैकी आम्ही केवळ त्यालाच बनवू जो पापभीरू आहे.''* *(दिव्य कुरआन, १९:६०-६३)*

(२२६) अशा सर्व लोकांसाठी उच्च दर्जे आहेत, सदाबहार उद्याने आहेत, ज्यात

कालवे वाहात असतील.

*"आणि जो त्याच्या ठायी ईमानधारक म्हणून हजर होईल, ज्याने सत्कृत्ये केली असतील अशा सर्व लोकांसाठी उच्च दर्जे आहेत, सदाबहार उद्याने आहेत ज्यांच्या खालून कालवे वहात असतील, त्यांच्यात ते सदैव राहतील, हा मोबदला आहे त्या व्यक्तीसाठी ज्याने पावित्र्य स्वीकारले."*

*(दिव्य कुरआन, २०:७५-७६)*

(२२७) ते सोन्याच्या कंकणांनी, मोत्यांनी आणि रेशमी पोषाखाने विभूषित केले जातील.

*"(दुसरीकडे) ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली त्यांना अल्लाह अशा स्वर्गांमध्ये दाखल करील ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील. तेथे ते सोन्याच्या कंकणांनी आणि मोत्यांनी विभूषित केले जातील. आणि त्यांचे पोषाख रेशमाचे असतील. त्यांना पवित्र गोष्ट स्वीकारण्याची सुबुद्धी प्रदान केलेली आहे आणि त्यांना स्तवनीय गुणसंपन्न ईश्वराचा मार्ग दाखविला गेला आहे." (दिव्य कुरआन, २२:२३-२४)*

(२२८) तेथे त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतील. तेथे ते सदासर्वदा राहतील.

*"यांना विचारा, हा शेवट चांगला आहे की तो शाश्वत स्वर्ग ज्याचे वचन ईशपरायण पापभीरूंशी केले गेले आहे? जे त्यांच्या कृतींचा मोबदला व त्यांच्या सफरीची शेवटची मजल असेल, ज्यात त्यांची प्रत्येक इच्छा पूर्ण होईल, ज्यात ते सदासर्वदा राहतील, जी प्रदान करणे तुमच्या पालनकर्त्याकडून एक पूर्ततायोग्य वचन आहे."*

*(दिव्य कुरआन, २५:१५-१६)*

(२२९) उंच उंच मजले असतील आणि शुभचिंतन व सलामाने स्वागत होईल किती छान आहे ते निवासस्थान!

*"ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आहे आणि ज्यांनी सत्कृत्ये केली आहेत, त्यांना आम्ही स्वर्गाच्या उच्च व बुलंद इमारतीत ठेवू ज्यांच्याखालून कालवे वाहात असतील. तेथे ते सदैव राहतील, किती छान मोबदला आहे कर्म करणाऱ्यांसाठी - त्या लोकांकरिता ज्यांनी संयम राखला*

*आहे, आणि जे लोक आपल्या पालनकर्त्यावर विश्वास ठेवतात.''*
*(दिव्य कुरआन, २९:५८-५९)*

(२३०) त्या बागात ते सुखेनैव राहतील.

*''ज्या लोकांनी ईमान धारण केले आहे आणि ज्यांनी सत्कृत्ये केली आहेत, ते एका बागेत आनंदित व प्रफुल्लित ठेवले जातील.''*
*(दिव्य कुरआन, ३०:१५)*

(२३१) जशी काही नेत्रसुखाची सामुग्री त्यांच्यासाठी तेथे दडवून ठेवली आहे, त्याची कोणालाही खबर नाही.

*''आमच्या वचनांवर तर ते लोक श्रद्धा ठेवतात ज्यांना ही वचने ऐकवून जेव्हा उपदेश दिला जातो तेव्हा ते नतमस्तक होतात आणि आपल्या पालनकर्त्याच्या प्रशंसेसह त्याचे पावित्र्यगान करतात व गर्व करीत नाहीत. (त्यांच्या पाठी अंथरुणापासून अलग राहतात, आपल्या पालनकर्त्याचे भय व आशा बाळगून पुकारतात, आणि जी काही उपजीविका आम्ही त्यांना दिली आहे, तिच्यातून खर्च करतात. मग जशी नेत्रसुखाची सामग्री त्यांच्या कृत्यांच्या मोबदल्यात त्यांच्यासाठी लपवून ठेवली आहे, तिची कोणत्याही व्यक्तीला खबर नाही.'' (दिव्य कुरआन, ३२:१५-१७)*

(२३२) तेथे सलाम व शुभचिंतनाने स्वागत केले जाईल व अल्लाहकडून मोठा सन्माननीय मोबदला आहे.

*''हे श्रद्धावंतांनो! अल्लाचे खूप स्मरण करा आणि सकाळ संध्याकाळ त्याचे पावित्र्यगान करीत राहा. तोच आहे जो तुम्हावर कृपा करतो आणि त्याचे दूत तुमच्यासाठी कृपेची प्रार्थना करीत असतात जेणेकरून त्याने तुम्हाला अंधकारातून प्रकाशात आणावे, तो श्रद्धावंतांवर फार मेहेरबान आहे. ज्या दिवशी ते त्याला भेटतील त्यांचे स्वागत सलामने होईल आणि त्यांच्यासाठी अल्लाहने मोठा सन्माननीय मोबदला तयार ठेवला आहे.''* *(दिव्य कुरआन, ३३:४१-४४)*

(२३३) तेथे त्यांना दुप्पट मोबदला मिळेल आणि उत्तुंग इमारतीत सुखसमाधानाने ते राहतील.

*“होय परंतु जे श्रद्धा ठेवतील आणि सत्कृत्ये करतील, हेच लोक आहेत ज्यांच्याकरिता त्यांच्या कृत्यांचा दुप्पट मोबदला आहे, आणि ते उंच व उत्तुंग इमारतीत समाधानाने राहतील. उरले ते लोक जे आमच्या संकेतांना खोटे ठरविण्यासाठी धावपळ करीत असतील तर ते प्रकोपात गुरफटले जातील.”* *(दिव्य कुरआन, ३४:३७-३८)*

(२३४) सुवर्ण कंकणे, मोती व रेशमी पोषाखाने ते शृंगारित केले जातील. कृतज्ञता व्यक्त करतील की अल्लाहने त्यांच्यापासून दुःख दूर केले.

*“हाच महान कृपाप्रसाद आहे. सदैव राहणारे स्वर्ग आहेत ज्यात हे लोक प्रवेश करतील. तेथे यांना सोन्याच्या कंकणांनी व मोत्यांनी शृंगारित केले जाईल. तेथे त्यांचा पोशाख रेशमी असेल, आणि ते म्हणतील, “अत्यंत आभारी आहोत त्या अल्लाहचे ज्याने आम्हापासून दुःख दूर केले, निःसंशय आमचा पालनकर्ता क्षमाशील व कदर करणारा आहे. ज्याने आम्हाला आपल्या कृपेने चिरंतन वास्तव्याच्या ठिकाणी वसविले. आता येथे आम्हाला कुठलाही त्रास सोसावा लागत नाही आणि कसला थकवादेखील येत नाही.”* *(दिव्य कुरआन, ३५:३२-३५)*

(२३५) स्वर्गात मौजमजेत ते निमग्न असतील. दाट सावलीत त्यांच्या पत्नी समवेत आसनावर तक्के लावून व स्वादिष्ट पदार्थ खातपीत राहतील.

*“आज स्वर्गातील लोक मौज करण्यात मग्न आहेत. त्यांची जोडपी गडद छायेत आहेत. आसनावर लोड लावून, हर तऱ्हेचे स्वादिष्ट पदार्थ खाण्यापिण्यासाठी त्यांच्याकरिता तेथे उपलब्ध आहेत, जे काही ते मागतील त्यांच्यासाठी हजर आहे. परमकृपाळू पालनकर्त्याकडून त्यांना सलाम सांगितला गेला आहे.”* *(दिव्य कुरआन, ३६:५५-५८)*

(२३६) हरतऱ्हेचे स्वादिष्ट पदार्थ असतील. ते समोरासमोर तख्तावर बसलेले असतील. पेयाच्या झऱ्यातून भरून आणलेले पात्र त्यांच्यामध्ये फिरविले जातील. त्यापासून त्यांच्या शरीराला अपाय होणार नाही आणि बुद्धीही भ्रष्ट होणार नाही. तेथे मृगनयनी स्त्रिया असतील.

*“पण अल्लाहचे निवडक दास (या वाईट शेवटापासून) सुरक्षित असतील.*

*त्यांच्यासाठी ज्ञात उपजीविका आहे. हरतऱ्हेचे स्वादिष्ट पदार्थ आणि ऐश्वर्यसंपन्न स्वर्गामध्ये ते सन्मानपूर्वक राहतील. तख्तांवर समोरासमोर बसतील. पेयाचे पात्र भरून भरून त्यांच्या दरम्यान फिरविले जातील. चकाकणारे पेय जे पिणाऱ्यांसाठी स्वादिष्ट असेल. त्यांच्या शरीरालाही त्यापासून काही अपाय होणार नाही व त्यांची बुद्धीदेखील भ्रष्ट होणार नाही. आणि त्यांच्यापाशी नजरा जपणाऱ्या सुंदर नेत्रांच्या स्त्रिया असतील, अशा नाजुक जणूकाही अंड्याच्या आतील पापुद्रा?''*

*(दिव्य कुरआन, ३७:४०-४९)*

(२३७) तेथे ते तक्के लावून बसलेले असतील. खूप मेवे व पेये ते मागवीत असतील. लाजऱ्या समवयस्क पत्नी त्यांच्या जवळ असतील.

*''ही एक आठवण होती. (आता ऐका की) ईशपरायणांसाठी निश्चितच उत्तम ठिकाण आहे, सदैव राहणाऱ्या स्वर्गात ज्यांची द्वारे त्यांच्यासाठी खुली असतील. त्यात ते लोड लावून बसले असतील, खूप खूप मेवे व पेये मागवीत असतील, आणि त्याच्याजवळ लाजऱ्या समवयस्क पत्नीं असतील. या त्या गोष्टी होत ज्या हिशेबाच्या दिवशी प्रदान करण्याचे तुम्हाला वचन दिले जात आहे. ही आमची सामग्री आहे जी कधींही संपणार नाही.'' (दिव्य कुरआन, ३८:४९-५४)*

(२३८) मजल्यावर मजले चढविलेल्या उत्तुंग इमारतीत ते असतील. त्यांच्या खालून कालवे वाहात असतील.

*''तथापि जे लोक आपल्या पालनकर्त्याशी भिऊन राहिले त्यांच्यासाठी उत्तुंग इमारती आहेत, मजल्यावर मजले चढविलेल्या, ज्यांच्या खाली कालवे वहात असतील, हे अल्लाहचे वचन आहे, अल्लाह कधीही आपल्या वचनाविरूद्ध जात नसतो.'' (दिव्य कुरआन, ३९:२०)*

(२३९) स्वर्ग निवासीयांना अमाप व बिनहिशेबी उपजीविका मिळेल.

*''हे राष्ट्रबंधुनो, हे ऐहिक जीवन तर क्षणभंगूर आहे, नेहमीच्या निवासाची जागा तर परलोकच आहे. जो दुराचार करील त्याला तेवढाच बदला मिळेल जितका याने दुराचार केला असेल आणि जो सत्कर्म करील, मग*

*तो पुरुष असो अथवा स्त्री, तो श्रद्धावंत असावा, असे सर्व लोक स्वर्गामध्ये प्रविष्ट होतील. तेथे त्यांना अमाप उपजीविका दिली जाईल.''*

*(दिव्य कुरआन, ४०:३९-४०)*

(२४०) तेथे अखंड व अक्षय मोबदला मिळेल.

*''उरले ते लोक ज्यांनी मान्य केले आणि सत्कृत्ये केली, त्यांच्यासाठी निश्चितपणे असा मोबदला आहे ज्याचा क्रम कधीही खंडित होणार नाही.''*

*(दिव्य कुरआन, ४१:८)*

(२४१) जो जी काही इच्छा करील व मनिषा बाळगेल ते त्याला मिळेल. असा मेजवानी सरंजाम असेल त्या क्षमाशील व दयावान अस्तित्वाकडून.

*''ज्या लोकांनी सांगितले की, अल्लाह आमचा पालनकर्ता आहे आणि मग ते त्यावर दृढ राहिले, निश्चितच त्यांच्यावर दूत उतरत असतात आणि त्यांना म्हणतात की, ''भिऊही नका व दुःखदेखील करू नका आणि खूश व्हा त्या स्वर्गाच्या खुशखबरीने जिचे वचन तुम्हाला दिले गेले आहे. आम्ही या जगाच्या जीवनातसुद्धा तुमचे सोबती आहोत आणि परलोकातसुद्धा. तेथे जी काही इच्छा कराल तुम्हाला मिळेल आणि प्रत्येक गोष्ट जिची तुम्ही मनिषा बाळगाल, ती तुमची होईल, असा आहे मेजवानीसरंजाम त्या अस्तित्वाकडून जो क्षमाशील व दयावान आहे.''*

*(दिव्य कुरआन, ४१:३०-३२)*

(२४२) त्यांच्यापुढे सोन्याची ताटे व पेले असतील आणि मनःप्रिय व नेत्रसुख देणाऱ्या वस्तू उपलब्ध असतील.

*''त्या दिवशी त्या लोकांना, ज्यांनी आमच्या वचनांवर श्रद्धा ठेवली होती आणि आज्ञाधारक बनून राहिले होते. प्रविष्ट व्हा स्वर्गामध्ये, तुम्ही आणि तुमच्या पत्नीं, तुम्हाला आनंदित केले जाईल.'' त्यांच्यासमोर सोन्याच्या थाळी आणि पेले फिरविले जातील. आणि प्रत्येक मनपसंत व आकर्षक वस्तू तेथे उपलब्ध असेल. त्यांना सांगितले जाईल, ''तुम्ही आता येथे सदैव राहाल. तुम्ही या स्वर्गाचे वारस आपल्या त्या कर्मामुळे बनला आहात, जे तुम्ही जगात करीत राहिलात. तुमच्यासाठी येथे*

*विपुल प्रमाणांत फळफळावळ उपलब्ध आहे जी तुम्ही खाल."*
*(दिव्य कुरआन, ४३:६९-७४)*

(२४३) ईशभीरू (ईशपरायण) लोक शांतीच्या स्थानी असतील, उद्यानात व झऱ्यात. त्यांच्यासाठी तलम रेशीम व किनखाबाची वस्त्रे असतील. मृगनयनी गोऱ्यापान स्त्रियांशी त्यांचा विवाह केला जाईल. त्यांना तेथे मृत्युपासून चिरकालीन सुटका असेल.

*"ईशभीरू लोक शांतीच्या स्थळी असतील. उद्यानात व झऱ्यांत, तलम रेशीम व जरतारी वस्त्रे परिधान करून समोरासमोर बसले असतील, असे असेल त्यांचे वैभव. आणि आम्ही गोऱ्यापान मृगनयनी स्त्रियाशी त्यांच्या जोड्या बनवू. तेथे ते समाधानपूर्वक हरतऱ्हेच्या चविष्ट वस्तू मागतील. तेथे मृत्यूची चव ते कधीही घेणार नाहीत. बस्स, जगात जो मृत्यू आला तोच आला. आणि अल्लाह आपल्या मेहेरबानीने त्यांना नरकाच्या प्रकोपापासून वाचवील. हेच मोठे यश होय."*
*(दिव्य कुरआन, ४४:५१-५७)*

(२४४) तेथे नितळ पाण्याचे कालवे वाहात असतील. चवीत यत्किंचितही फरक नसणाऱ्या दुधाचे आणि स्वच्छ व शुद्ध मधाचेही कालवे वाहात असतील. शिवाय सर्व प्रकारची फळफळावळ आणि क्षमादान प्राप्त होईल.

*"ईशपरायण लोकांसाठी ज्या स्वर्गाचे वचन दिले गेले आहे त्याचे वैभव तर असे आहे की त्यात कालवे वाहत असतील निवळलेल्या पाण्याचे, अशा दुधाचे ज्याच्या चवीत यत्किंचितसुद्धा फरक आलेला नसेल, अशा पेयांचे जे पिणाऱ्यांसाठी स्वादिष्ट असेल. कालवे वाहत असतील स्वच्छ व शुद्ध मधाचे. त्यात त्यांच्यासाठी हर प्रकारची फळे असतील आणि त्यांच्या पालनकर्त्याकडून क्षमादान (काय तो मनुष्य ज्याच्या वाट्याला हा स्वर्ग येणार आहे) त्या लोकांसमान होऊ शकतो जे नरकामध्ये सदैव राहतील आणि ज्यांना असले गरम पाणी पाजले जाईल जे त्यांचे आंतडेसुद्धा कापून टाकील?"* *(दिव्य कुरआन, ४७:१५)*

(२४५) तेथे ते जे काही इच्छितील ते सर्व मिळेलच शिवाय अल्लाहतर्फे आणखी

अधिक काही मिळेल.

*"आणि स्वर्ग ईशपरायणांच्या जवळ आणला जाईल, जरादेखील दूर असणार नाही. फर्माविले जाईल, "ही आहे वस्तू जिचे तुम्हाला वचन दिले जात असे, त्या प्रत्येक माणसासाठी जो रुजू होणारा आणि खूप खबरदारी घेणारा होता. जो न पाहता 'रहमान' (परमदयाळू अल्लाह) ला भीत असेल आणि जो ईश्वरासक्त हृदयाने आला असेल. सांगितले जाईल, "दाखल व्हा स्वर्गामध्ये सुखरूपपणे." त्या दिवशी शाश्वत जीवनाचा दिवस असेल. तेथे त्यांच्यासाठी ते सर्वकाही असेल जे ते इच्छितील, आणि आमच्याजवळ त्यापेक्षाही जास्त बरेचसे त्यांच्यासाठी असेल."* *(दिव्य कुरआन, ५०:३१-३५)*

(२४६) उद्याने व झरे असतील आणि अल्लाहकडून जे जे मिळेल त्याचा आनंदाने स्वीकार करतील.

*"मात्र ईशपरायण लोक त्या दिवशी उद्यानात आणि झऱ्यांच्या दरम्यान असतील, जे काही त्यांचा पालनकर्ता त्याना देईल ते आनंदाने घेत असतील ते त्या दिवसाच्या येण्यापूर्वी सत्कर्मी होते, रात्री कमीच झोपत असत, मग तेच रात्रीच्या शेवटच्या प्रहरी क्षमायाचना करीत असत, आणि त्यांच्या मालमत्तेत हक्क आहे याचकांचा आणि वंचितांचा."*
*(दिव्य कुरआन,५१:१५-१९)*

(२४७) उद्याने कालवे असतील आणि महान सत्ताधिकारी बादशाहसमीप प्रतिष्ठेचे स्थान.

*"अवज्ञेपासून अलिप्त राहणारे खचितच उद्यानात आणि कालव्यांत असतील, खऱ्या प्रतिष्ठेची जागा, महान सत्ताधिकारी बादशहाच्या समीप."*
*(दिव्य कुरआन, ५४:५४-५५)*

(२४८) सर्व फळे व मेवे दोन प्रकारचे असतील. दाट रेशमी बिछायती असतील. फळाने लदलेली झाडे झुकलेली असतील. कोणीही स्पर्श न केलेल्या लाजाळू नजरेच्या स्त्रिया असतील.

*"आणि त्या प्रत्येक इसमासाठी जो आपल्या पालनकर्त्याच्या पुढे पेश*

*होण्याची भीती बाळगत असेल. दोन उद्याने आहेत. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? हिरव्यागार शाखांनी भरपूर. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? दोन्ही उद्यानांत दोन झरे प्रवाहित. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? दोन्ही उद्यानांत प्रत्येक फळाचे दोन प्रकार. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? जन्नती लोक अशा बिछाईतीवर लोड लावून बसतील ज्यांचे अस्तर दाट रेशमाचे असेल आणि उद्यानाच्या (झाडांच्या) शाखा फळांनी वाकल्या जात असतील, आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल. या ऐश्वर्यादरम्यान लाजाळू नजरवाल्या असतील, ज्यांना या स्वर्गस्थ लोकांच्या अगोदर कधी कोणा मानवाने अथवा जिन्नाने स्पर्श केलेला नसेल, आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? अशा सुंदर जणू हिरे आणि मोती, आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना खोटे ठरवाल?''*

*(दिव्य कुरआन, ५५:४६-५९)*

(२४९) त्यांच्यासाठी सुखकारक व उत्तम उपजीविका असणारे ऐश्वर्यसंपन्न स्वर्ग असेल.

*''मग तो मरणारा जर निकटवर्तीयांपैकी असेल तर त्याच्यासाठी सुख आणि उत्तम उपजीविका व ऐश्वर्यसंपन्न स्वर्ग आहे. आणि जर तो उजव्या बाजूवाल्यांपैकी असेल तर त्याचे स्वागत असे होईल की सलाम आहे तुला, तू उजव्या बाजूवाल्यांपैकी आहेस.''*

*(दिव्य कुरआन, ५६:८६-९१)*

(२५०) तेथे त्रासदायक अतिउणही नसेल. तसेच कडाक्याची थंडीही नसेल. झाडांना लदलेली फळे झुकलेली असतील. पारदर्शक चांदीची भांडी व पेले असतील.

*''म्हणून महान अल्लाह त्यांना त्या दिवसाच्या संकटापासून वाचवील आणि त्यांना टवटवीतपणा व उल्हास प्रदान करील आणि त्यांच्या संयमाबद्दल५ त्यांना स्वर्ग व रेशमी पोशाख प्रदान करील. तेथे ते उच्च आसनावर तक्के लावून बसले असतील. त्यांना ना उन्हाची उष्णता त्रास देणार ना हिवाळ्याचा गारवा. स्वर्गाची छाया त्यांच्यावर झुकून सावली*

*करीत असेल आणि त्याची फळे सदैव त्यांच्या आवाक्यात असतील (ती हवे तशी तोडून घ्यावीत) त्यांच्यापुढे चांदीची भांडी आणि काचेचे पेले फिरविले जात असतील. पेलेही ते जे चांदीचे असतील आणि ते (स्वर्गाच्या व्यवस्थापकांनी) योजनाबद्ध भरले असतील. त्यांना तेथे अशा पेयाची पेये पाजली जातील ज्यात सुंटीचे मिश्रण असेल.''*

*(दिव्य कुरआन, ७६:११-१७)*

(२५१) तेथे दाट सावल्या व झरे असतील. इच्छेप्रमाणे फळे मिळतील.

*''ईशपरायण लोक आज सावली आणि झऱ्याच्या सान्निध्यात आहेत. आणि जी फळे ते इच्छितील (त्यांच्यासाठी) हजर आहेत. खा आणि प्या मजेने आपल्या त्या कृत्यांच्या मोबदल्यात जी तुम्ही करीत राहिला आहात. आम्ही सदाचारी लोकांना असाच मोबदला देत असतो. विनाश आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी.''*

*(दिव्य कुरआन, ७७:४१-४५)*

(२५२) तेथे उद्याने असतील, द्राक्षे व समवयस्क नवयुवती आणि ओसंडणारे पेले असतील. तेथे कसलेही वायफळ अगर खोट्या गोष्टी ऐकाव्या लागणार नाहीत.

*''निश्चितच ईशपरायणांसाठी यशाचे एक स्थान आहे. उद्याने आणि द्राक्षे आणि समवयस्क नवयुवती आणि ओथंबणारे पेले. तेथे कोणतीही व्यर्थ आणि खोटी गोष्ट ते ऐकणार नाहीत. मोबदला आणि पुष्कळ इनाम. तुमच्या पालनकर्त्याकडून त्या अत्यंत मेहेरबान ईश्वराकडून जो पृथ्वी आणि आकाशांचा आणि त्यांच्यामधील प्रत्येक वस्तूचा स्वामी आहे, ज्याच्यासमोर कुणाची बोलण्याची हिंमत नसेल.''*

*(दिव्य कुरआन,७८:३१-३७)*

(२५३) तेथील लोकांच्या चेहऱ्यावर खुशालीचे तेज झळकत असेल. सर्व प्रकारच्या सुखचैनीच्या वस्तू प्राप्त होतील.

*''कदापि नाही निःसंदेह सदाचारी माणसाची कर्मनोंद उच्च दर्जाच्या लोकांच्या दप्तरात आहे आणि तुम्हाला काय माहीत की काय आहे ते उच्च दर्जाच्या लोकांचे दप्तर? एक लिहिलेले पुस्तक, ज्याची देखरेख*

*जवळीक असलेले दूत करतात. नि:संदेह सदाचारी लोक मोठ्या मजेत असतील. उच्च आसनांवर बसून पहात असतील. त्यांच्या चेहऱ्यावर तुम्हाला आनंदाचे तेज जाणवेल. त्यांना शुद्ध व उत्तम मोहोरबंद पेय पाजले जाईल ज्यावर कस्तुरीची मोहर लागली असेल. जे लोक दुसऱ्यावर मात करू इच्छितात त्यांनी ही वस्तू प्राप्त करण्याचा प्रयत्न करावा. त्या पेयात तसनीमचे मिश्रण असेल. हा एक झरा आहे ज्याच्या पाण्याबरोबर जवळचे लोक पेय प्राशन करतील.''*

*(दिव्य कुरआन, ८३:१८-२८)*

(२५४) तेथे चेहरे प्रफुल्लित असतील, झरे वाहात असतील, उच्च आसनावर लोडांच्या रांगा आणि उत्कृष्ट बिछायती अंथरलेल्या असतील.

*''काही चेहरे त्या दिवशी प्रफुल्लीत असतील. आपल्या कामगिरीवर आनंदीत असतील, उच्चकोटीच्या स्वर्गामध्ये असतील. कोणतीही वाह्यात गोष्ट ते तेथे ऐकणार नाहीत. त्यात झरे प्रवाहित असतील, त्याच्यात उच्च आसने असतील, पेले ठेवलेले असतील, लोडांच्या रांगा लावलेल्या असतील, आणि उत्कृष्ट बिछाने अंथरलेले असतील.''*

*(दिव्य कुरआन, ८८:८-१६)*

(२५५) अल्लाह त्यांच्याशी प्रसन्न झाला आणि ते अल्लाहशी खूश झाले.

*''ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली ते निश्चितच उत्तम निर्मिती आहेत. त्यांचा बदला त्यांच्या पालनकर्त्यापाशी चिरंतन निवासाचे स्वर्ग आहेत ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील, ते त्यात सदासर्वदा राहतील. अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न झाला व ते अल्लाहशी राजी झालेत. हे असे आहे त्या माणसासाठी ज्याने आपल्या पालनकर्त्याच्या कोपाचे भय बाळगले.''* *(दिव्य कुरआन, ९८:७-८)*

# उपसंहार

## खरे जीवन मृत्युनंतरचे

ईमानधारक जीवनभर अल्लाहच्या आदेशांचे पालन करतो. आपल्या आज्ञाधारकतेचा त्याला शेवटी जो बदला मिळतो, तो ईमान धारण न करणाऱ्या व्यक्तीपेक्षा अगदी भिन्न आहे जो आपले पूर्ण आयुष्य मनोकामनांची पूर्ती करण्यात खपवितो. अशा ईशद्रोहीला जीवनभर अल्लाह आणि मोबदल्याच्या दिवसाची आठवण होत नाही. अशा प्रकारे ईशपरायण आणि ईशद्रोही दोघांची या जगातील जीवनशैलीसुद्धा भिन्न भिन्न असते. या दोघांच्या जीवनातील फरक हा त्यांना त्यांच्या मृत्युसमयी ठळकपणे दिसून येतो. ईमानधारक व्यक्तीचा प्राण दूत हळुवारपणे काढून घेतो. परंतु ईशद्रोहीचा प्राण अगदी राकटपणे दूताकरवी काढला जातो.

दूत मृत्युसमयी ईशपरायण व्यक्तीला सलाम करून स्वागत करतो आणि जन्नत (स्वर्ग) प्राप्तीची खूशखबर त्या व्यक्तीला देतो. त्यानंतर हळुवारपणे ईशपरायण व्यक्तीचे प्राण हरण केले जाते. मृत्यु अटळ आहे आणि मृत्युपश्चातचे जीवन एक वास्तविकता आहे; याविषयीचा जीवनध्यास असल्याने येणाऱ्या शाश्वत जीवनाची पूर्वतयारी या जगात ईमानधारक जीवनभर करतो.

याउलट ईशद्रोही मृत्युसमयीच्या भयंकर यातनांना सामोरे जातो. पारलौकिक जीवनाची वस्तुस्थिती आणि मृत्यु अटळ आहे, ही जाणीव असूनसुद्धा तो जीवनभर या सत्यतेकडे डोळेझाक करतो. नरकाचे नियुक्त दूत येऊन अशा ईशद्रोही व्यक्तीच्या तोंडावर आणि पाठीवर ठोसे लगावतात आणि त्याचा प्राण कठोरतेने काढून घेतात. त्या वेळी त्याला भयंकर यातना होतात. अपमानकारकरित्या आणि यातनादायी पद्धतीने काढलेल्या प्राणाला सतत जळण्याची शिक्षा भोगावी लागते. कुरआनस्पष्टोक्ती आहे,

“जर तुम्ही ते दृश्य पाहू शकला असता तर किती छान झाले असते! जेव्हा दूत विद्रोहींचे प्राण हरण करताना त्यांच्या चेहऱ्यावर व पाठीवर मारा करीत म्हणत होते, “घ्या आता जळण्याची शिक्षा भोगा, हा तो मोबदला आहे ज्याची सामग्री तुम्ही स्वहस्ते अगोदरच उपलब्ध करून ठेवलेली होती, एरव्ही अल्लाह तर आपल्या दासांवर मुळीच अत्याचार करणारा नव्हे.”

*(दिव्य कुरआन, ८:५०-५१)*

ईमानधारक या जगाला परीक्षाकाळ समजून जीवनभर या जगात पारलौकिक जीवनाची तयारी करीत असतो आणि आपल्या पालनकर्त्यापाशी या जगाची आणि पारलौकिक जीवनाची सफलता प्राप्तीसाठी प्रार्थना करतो. तो क्षमायाचना करतो आणि नरकाग्नीपासून सुरक्षित राहण्यासाठी विनवणी करतो.

*"हे आमच्या स्वामी, जे अपराध आमच्याकडून झाले आहेत त्याबद्दल क्षमा कर, ज्या वाईट गोष्टी आमच्यात आहेत त्यांना काढून टाक आणि आमचा अंत सदाचारी लोकांसमवेत कर. हे प्रभु! जी वचने तू आपल्या पैगंबरंद्वारे केलेली आहेस ती आम्हासाठी पूर्ण कर आणि पुनरुत्थानाच्या दिवशी आम्हाला नामुष्की देऊ नकोस, निःसंशय तू वचनभंग करणारा नाहीस."* *(दिव्य कुरआन, ३:१९३-१९४)*

"आम्हाला तर आमच्या पालनकर्त्याकडून त्या दिवसाच्या प्रकोपाची भीती लागलेली आहे जो भयंकर संकटाचा अत्यंत प्रदीर्घ दिवस असेल." म्हणून महान अल्लाह त्यांना त्या दिवसाच्या संकटापासून वाचवील आणि त्यांना टवटवीतपणा व उल्हास प्रदान करील."

*(दिव्य कुरआन, ७६:१०-११)*

येणारी शेवटची घटका आणि येऊ घातलेले शाश्वत पारलौकिक जीवन या दोन अतिमहत्त्वाच्या वास्तविक घटना आणि वस्तुस्थिती मानवाच्या प्रतिक्षेत आहेत. यासाठीच या जगाला मनुष्यासाठी परीक्षाकाळ म्हटले आहे. या जगात तुमचे जीवनमान, नोकरी-धंदा, लग्न, संपत्ती इ. शाश्वत जीवनापुढे जे येऊ घातले आहे, सर्व नगण्य आहे. त्यांच्यासाठी हे जीवन बरबाद करणे अगदी व्यर्थ आहे. या जगात फक्त आणि फक्त ईशप्रसन्नता प्राप्त करणे हेच जीवनध्येय बनले पाहिजे आणि यास पर्याय नाही. या शाश्वत पारलौकिक जीवनाची सुरवात अल्लाह विलक्षण पद्धतीने करणार आहे. या कयामतच्या दिवशी प्रत्येकाला कळून चुकेल की या जगातील जीवन क्षणभंगूर होते आणि ज्या अंतिम दिनाविषयी (कयामत) अल्लाह आणि त्याचे पैगंबर यांनी सांगितले, ते सत्य व वस्तुस्थिती आहे. कयामतच्या दिवशापूर्वी या जगात मनुष्याला परलोकध्यास सतत लागला पाहिजे आणि निर्णयाच्या दिवसाचा अविरत ध्यास लागून राहिला पाहिजे.

कयामतच्या दिवशी समस्त मानवजातीला पुन्हा दुसऱ्यांदा निर्माण करून अल्लाहच्या न्यायालयात हजर केले जाईल. सर्वांना आपल्या पालनकर्त्यापुढे हजर केले जाईल. त्या

दिवशी चांगल्याचा चांगला बदला आणि वाईटाचा वाईट बदला दिला जाईल आणि कोणावरही यत्किंचितही अन्याय केला जाणार नाही. त्या न्यायनिवाड्याच्या दिवशी अल्लाह न्याय देईल. या जगात तुम्हाला अल्लाहने जी संधी दिली आहे त्याचे सोने करणे तुमच्या हातात आहे, ज्यामुळे तुम्ही पारलौकिक जीवनात मोबदला, सुख-शांती प्राप्त करू शकाल, ज्याची तुलना या जगातील जीवनाशी होऊच शकत नाही. मानवाला फक्त एक ईश्वर, अल्लाहवर ईमान धारण करावयाचे आहे आणि पारलौकिक जीवनाला मान्य करून मृत्युपश्चातचे जीवन एक वस्तुस्थिती आहे यावर दृढ विश्वास ठेवून अल्लाहने तुम्हाला दिलेल्या सर्व देणग्यांविषयी आणि कृपाप्रसादाविषयी कृतज्ञ बनून या जगात त्याचे आज्ञांकित राहून जीवन जगावयाचे आहे. तुम्ही जर या जगात अल्लाहचे कृतघ्न बनून राहिला आणि मरेपर्यंत ईशद्रोही बनून राहिला तर पारलौकिक जीवनात जीवघेण्या नरकयातना भोगाव्या लागतील.

"नुकसानीत आहेत ते लोक ज्यांनी अल्लाहशी आपल्या भेटीच्या वार्तेला खोटे ठरविले. जेव्हा आकस्मिक ती घटका येऊन ठेपेल तेव्हा हेच लोक खेद व्यक्त करतील की, "आमच्याकडून याबाबतीत कशी चूक झाली." आणि यांची दशा अशी असेल की त्यांनी आपल्या पाठीवर आपल्या पापाचे ओझे घेतले असेल. पहा किती वाईट ओझे आहे जे हे उचलत आहेत. ऐहिक जीवन तर एक खेळ-तमाशा आहे. वास्तविक पाहता मरणोत्तर जीवनाचे ठिकाणच त्या लोकांकरिता अधिक उत्तम आहे जे दुराचारापासून अलिप्त राहू इच्छितात. मग काय तुम्ही बुद्धीचा उपयोग करणार नाही?"

*(दिव्य कुरआन, ६:३१-३२)*

यावरून हेच स्पष्ट होते की तुम्ही पारलौकिक जीवनाच्या वास्तविकतेला आणि निश्चिततेला स्वीकारावे आणि ते शाश्वत जीवन सफल होण्यासाठी या जगातील जीवनात प्रयत्नशील राहिले पाहिजे म्हणजे तशी तयारी केली जाणे आवश्यक आहे. याच परलोकध्यासामुळे तुमचे या जगातील जीवन आणि त्यातील तुमची कामगिरी शाश्वत मूल्याधारित होईल. अशाच स्थितीत तुम्ही या जगातील जीवन एक परीक्षाकाळ समजून त्यातील प्रत्येक क्षण अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी खर्च करू लागाल. तुम्ही तुमचे पूर्ण जीवन अल्लाहच्या आज्ञांकित कराल. याचमुळे तुम्हाला या जगात आणि पारलौकिक जीवनातसुद्धा सफलता प्राप्त होणार आहे. या जगातील क्षणभंगूर जीवनाचेसुद्धा आणि शाश्वत अशा

पारलौकिक जीवनाचेसुद्धा कल्याण होईल. मृत्युपश्चात जीवनात हा मोबदला स्वर्गाच्या रूपात तुम्हाला मिळेल. तुम्ही ही खूणगाठ आपल्याशी बांधून ठेवा आणि दृढ ईमान धारण करा, यावर की मोबदल्याच्या दिवशी तुम्हा-आम्हा सर्वांनाच ईशन्यायालयात अल्लाहसमोर हजर होणे आहे. म्हणूनच ईमान धारण कण्यामुळेच तुम्ही या दोन्ही जगात यशस्वी होणार आहात आणि स्वर्ग जे तुमचे शाश्वत निवासस्थान असेल तिथे जे काही इच्छितील ते सर्व मिळेलच शिवाय अल्लाहतर्फे आणखी अधिक काही मिळेल. अल्लाह तुमच्याशी प्रसन्न झाला आणि तुम्ही अल्लाहशी खूश झाले.

"हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा आणि प्रत्येक इसमाने हे पाहावे की त्याने उद्यासाठी काय सरंजाम केला आहे. अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगत राहा. अल्लाह खचितच तुमच्या त्या सर्व कृत्यांची खबर राखणारा आहे जी तुम्ही करता. त्या लोकांप्रमाणे बनू नका जे अल्लाहला विसरून गेले तर अल्लाहने त्यांना स्वत:चा विसर पाडला. हेच लोक अवज्ञाकारी आहेत. नरकात जाणारे आणि स्वर्गामध्ये जाणारे कदापि एकसमान असू शकत नाहीत. स्वर्गामध्ये जाणारेच वास्तविकपणे यशस्वी होत." *(दिव्य कुरआन, ५९:१८-२०)*

मनुष्य आपले नुकसान व अहित कधीही इच्छित नाही. जीवनाची वाटचाल ईशमार्गावरच करावी, हे खरे तर मानवाच्या स्वभावातच आहे. म्हणून आपले जीवन सार्थक करण्यासाठी ईशधर्माच्या मौलिक धारणा स्वीकारून मनुष्यचारित्र्य तसेच या समाजाचे व देशाचे नवनिर्माण करण्यासाठी आणि मानवतेची प्रतिष्ठा व गौरव जपण्यासाठी इस्लामी जीवनपद्धतीशिवाय जगापुढे दुसरा पर्याय नाही.

**- ० - समाप्त - ० -**